# दोन शब्द.

यूजेन् लाबीश् ( Eugene Labiche ) आणि एड्. मार्त ( Ed. Martin ) या दोन प्रसिद्ध फ्रेंच नाटककारांचीं कांहीं नाटकें, मी गतवर्षीं हिंदुस्तानांत आल्यावर आप्पांना—माझ्या वडिलांना—वाचून दाखिवलीं. "ह्यांपैकीं एकाद्दुसऱ्या नाटकाचें तूं मराठींत भाषांतर अथवा रूपांतर कां करीत नाहींस ?" असा मला त्यांनीं सहज प्रश्न केला. "ठीक आहे, करून पहातें" असें उत्तर देऊन, त्याच दिवशीं "ल व्हाय्याज् द मसिय् पेरिशाँ" ( Le Voyage de Monsieur Perrichon ) या नाटकाचें भाषांतर करण्याच्या उद्योगास मी लागलें. आप्पांचा साठावा वाढदिवस तीन महिन्यांच्या अंतरावर होता व त्या प्रसंगीं "चढाओढ" त्यांना नजर करण्याचा माझा उद्देश होता. तथापि मध्यंतरीं अनेक अडचणी उद्भवल्यामुळें, योजिलेल्या दिवशीं, या नाटिकेस पूर्ण स्वरूप मला देतां आलें नाहीं.

कथानकास व कथानकांतील सर्व पात्रांस शक्य तितकें बाळबोध वळण देण्याचा प्रयत्न मीं केला आहे. परंतु शेरेबुक व द्वंद्वयुद्ध या दोन विलायती रिवाजांना योग्य असें मराठी रूप न सांपडल्यानें देशभक्त तात्यासाहेब केळकर यांनीं म्हटल्याप्रमाणें "धेडगुजरी प्रकार" मला टाळतां आला नाहीं.

अनेक वर्षें मी विलायतेस असतां मला वरचेवर मराठींत मनोरंजक पत्रें लिहून, मातृभाषेची व माझी ओळख कायम राखण्याचें श्रेय माझी आजी श्री. यमुनाबाई जोशी यांनाच सर्वस्वीं देऊन त्यांचे मी येथें प्रेमपूर्वक आभार मानतें. तसेंच "चढाओढीचें" काम चालूं असतां वेळोवेळीं मला केलेल्या मदतीबद्दल व वारंवार मला दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल, लोकमान्य टिळक यांची कन्या सौ. रमाबाई साने यांचेही मी मनःपूर्वक आभार मानतें.

" सोयरीक " ही नाटिका वाचकांच्या जगीं प्रथम हातीं पडली असली तरी ती " चढाओढी "च्या नंतरच लिहिली आहे. या माझ्या दोन " नाट्यापत्यांचा " देशभक्त तात्यासाहेब केळकर यांनीं अभिप्रायरूपानें जो गौरव केला आहे त्याबद्दल मी त्यांची चिरकाल ऋणी आहे.

तसेंच, माझ्या " सोयरीक " या नाटिकेंतील गुणदोष दाखवून प्रो. वामन मल्हार जोशी यांनीं लिहिलेल्या मुद्देसूद व सहानुभूतिपूर्ण प्रस्तावनेबद्दल मीं त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

माझीं दोन्हीं पुस्तके इतक्या थोड्या अवधींत छापून दिल्याबद्दल आर्यभूषण छापखान्याचे मनःपूर्वक आभार मानून, वाचकहो, मी तुमची रजा घेतें.

सौ. शकुंतला परांजपे-स्लेप्टसॉफ.

॥ श्री ॥

# दोन प्रहसनें



## ( अभिप्राय )

श्री. सौ. शकुंतलाबाई परांजपे-स्लेप्टसॉफ यांस

तुम्हांकडून तुमच्या दोन प्रहसनांचीं छापील प्रुफें आलीं तीं वाचलीं. मोठी करमणूक झाली. ह्यांतील विनोद फार मौजेचा आहे. आणि विशेष हें कीं, तो विनोद मनुष्य स्वभावावर उत्तम प्रकाश पाडणारा आहे. शाब्दिक कोट्या वगैरे कांहीं नसून विनोद प्रसंगनिष्ठ आहे. यामुळें तो वरच्या प्रतींत गणला जाईल.

'सोयरीक' या प्रहसनांत वधू व वर या दोन्ही बाजूची मंडळी आपली खोटी श्रीमंती खरी भासवून दुसऱ्या पक्षाला फसविण्याचा प्रयत्न करीत असतात, दोघांचीहि फजीति परिचित तिऱ्हाइतांकडून केला जाते. हाच तंतोतंत सर्व प्रकार प्रत्यहि अनुभवास येत नसला तरी, दिखाऊ श्रीमंतीचा मोसम लग्न सराईत आल्याशिवाय राहात नाहीं हें अगदीं खरें आहे.

'चढाओढ' हें प्रहसन 'सोयरीक' या प्रहसनापेक्षां अधिक गुंतागुंतीचें व त्यामुळेंच अधिक मनोरंजक आहे. त्यांतील वधू हस्तगत करूं इच्छिणाऱ्या दोघाहि तरुणांनीं डावपेंच लढविले ते वाचीत असतां अखेर निकाल काय होणार याकडे मन शंकासुखांत हेलकावे खात असतें. या चढाओढीचा निकाल ज्या एका तत्त्वावर लावला तें मात्र अत्यंत मार्मिक असून, त्यांत मानसशास्त्राची खोल दृष्टि दिसून येते. दुसऱ्यावर परोपकार करून त्याला कृतज्ञतेच्या भाराखालीं लववून, लाजवून, उपकाराची आठवण देऊन, आपलें जितकें कार्य होईल ह्यापेक्षां दुसऱ्याकडून स्वतः आपणावर उपकार झाल्याचा बहाणा करून, ह्या उपकाराखालीं

आपण दबून गेलों अशा अर्थाचा मोठेपणा ( मग तो खोटा कां असेना ) दुसऱ्याच्या पदरीं बांधल्यानें आपलें कार्य अधीक सुकर होतें. खरोखर किती थोडे लोक हें तत्त्व ओळखतात ?

असो. पहिल्या प्रहसनापेक्षां दुसऱ्या प्रहसनांत बुद्धिमत्ता व मनुष्य-स्वभावाचें ज्ञान खाचित अधिक आहे. पहिलें प्रहसन लहानसें म्हणून तें कॉलेजांतील मुलांमुलींनीं संमेलनासारख्या प्रसंगीं करण्यास मोठें सोयीचें आहे. दुसरें मोठें आहे, इतकेंच नव्हे तर ह्यांत प्रसंग भरपूर यामुळें त्याचा एखादा चांगला बोलपट करितां येईल असें मला वाटतें.

दोन्ही प्रहसनांतील तुमची भाषा अत्यंत सोपी, व्यवहारांतली, आणि ठसकेदार आहे. तुम्ही हिंदुस्थान सोडल्याला बरेच दिवस झाले असतां, आणि माझ्या समजुतीप्रमाणें तुम्ही पूर्वी मराठींतील लेखनव्यवसाय विशेष रीतीनें केला नसतां, अगदीं ‘ देवल ’ पद्धतीची सोपी भाषा घालूं शकला, कोठेंहि अडखळला नाहीं किंवा धेडगुजरीपणा केला नाहीं, याचें कौतुक वाटतें. दुसऱ्या प्रहसनांत रूपांतर करतांना कथानकांत धेडगुजरी प्रकार दिसतो तो मूळच्या ग्रंथांत वर्णन केलेल्या समाजाच्या चालीरीतीचा आहे. त्याला तुमचा नाइलाज आहे.

असो. स्विट्झरलंडच्या निसर्गसुंदर प्रदेशांत व थंड हवेंत बसल्या-बसल्या नाट्यवाङ्मयांतच काय पण इतर प्रकारच्या वाङ्मयांतहि भर घालाल तर फार चांगलें होईल. मातृभाषेच्या प्रेमाच्या पाशानें तुम्हांला महाराष्ट्राशीं या एका गोष्टीपुरतें जखडून ठेविलें तरी तो पाश तुम्ही आनंदानें स्वीकाराल व महाराष्ट्रालाहि ती गोष्ट प्रिय अशीच वाटेल यांत शंका नाहीं. कळावें.

पुणें, ता. १६-९-३६ } **न. चिं. केळकर.**

# चढाओढ



## अंक पहिला

### प्रवेश पहिला

( **स्थळः**— औरंगाबादचें स्टेशन )

( गणपतराव शहाणे, त्यांची पत्नी सरस्वती व कन्या विद्या अशीं तिघें तिकिटऑफिसच्या बाहेर उभी आहेत. गणपतरावांचा पोषाख जुन्या पद्धतीचा असून डोळ्यांवर एक चांदीच्या फ्रेमचा चष्मा चढवला आहे. )

**गणपतरावः**–चला, चला. आतां इकडे तिकडे करूं नका. नाहींतर एकमेकांस शोधतां शोधतांच गाडी निघून जायची. अरे, आपलीं बोचकीं कुठें गेलीं ? ( सभोंवार बघून ) आहेत आहेत, पण माझी छत्री कोणाजवळ आहे ?

**विद्याः**–बाबा माझ्याजवळ नाहीं का तुम्हीं दिलीत ?

**गणपतरावः**–अरे हो ! आणि तांब्या ?

**सरस्वतीः**–हा माझ्याजवळ आहे.

**गणपतरावः**–पण फळांची टोपली ? राहिली वाटतं टांग्यांत. नशीब त्या टांगेवाल्याचं. अरे ए...( धांवूं लागतो. त्याच्याच हातांतील टोपलींतील दोन संत्रीं पायांखालीं सांपडून तो खालीं पडतो. टोपलीही सर्व उपडी होते ). हात्तिच्या. माझ्याच तर हातांत आहे टोपली. ( तिघें फळें गोळा करूं लागतात ). रामा, रामा ! काय उकडतय्.

**सरस्वती:**–उकडेल नाहीं तर काय ? सदोदीत धांदल धांदल. इकडे पळ, तिकडे धांव ! काय त्या प्रवासांत सुख लागणार ?

**गणपतराव:**–सुरवातीस होणारच थोडासा त्रास. पण एकदा गाडी सुरू झाली कीं—खरंच तिकिटं काढायचीं आहेत अजून. अग तुम्हीं येथून हालूं नका. मीं तिकिटें काढून येतों. ( हातांतील टोपली विद्येला देऊन ) ही टोपली धर. ( तिकिट ऑफिसच्या खिडकीजवळ जाऊन ) पुण्याचीं सेकंड क्लासचीं तीन तिकिटें द्या बरं.

**तिकिट मास्तर:**–( खिडकीच्या आंतून ) अजून ऑफिस उघडलें नाहीं. अर्धा तास अवकाश आहे.

**गणपतराव:**–खरं का ? मला कुठून माहीत असणार. आजपर्यंत मीं स्टेशनचें तोंड पाहिलें असेल तर शपथ. ( सरस्वतीजवळ जाऊन ) गाडी सुटायला अजून पुष्कळ वेळ आहे म्हणे.

**सरस्वती:**–नव्हतें मीं सांगत कीं रग्गड वेळ आहे म्हणून ? पण मली घाईघाई करून धड जेवूं सुद्धां दिलं नाहीं.

**गणपतराव:**–उशीर होण्यापेक्षां लवकर आलेलंच बरं. इकडे तिकडे बघायला तरी अवसर मिळतो ( विद्येस ) काय विद्याबाई, झालं एकदां समाधान ? लागलोंच म्हणायचे महाबळेश्वरच्या वाटेस. थोड्या मिनिटांचा अवकाश कीं सुटली गाडी भरकन्.

**विद्या:**–बाबा, कमींत कमी दोन वर्षें तरी झालीं असतील, तुम्हीं आम्हांला महाबळेश्वरला न्यायचें वचन दिलें होतें.

**गणपतराव:**–कबूल. पण निघायच्या आधीं मला कांहीं थोडी रक्कम वसूल करून घ्यायची होती. व्यापारांत पडलेल्या माणसाला काय शाळें-तल्या पोरींसारखें केलीं पुस्तकें गोळा आणि लागल्या वाटेला असं थोडंच करतां येणार आहे ? शिवाय म्हटलं आधीं एकदां विद्यादेवी विद्या-लयाची पहिली पायरी निर्विघ्नपणें चढूं देत मग हळुहळु त्यांना विश्व-

परिचय घडवून देऊन बहुश्रुत करूं. त्यानिमित्त महाबळेश्वरासारखें सृष्टिसुंदर जगप्रसिद्ध पर्वतस्थान—

**सरस्वतीः**— आई जगदंबे हें असंच चालायंच आहे कीं काय ?

**गणपतरावः**— काय म्हणालीस ?

**सरस्वतीः**— म्हटलं आपल्या भाषालंकारांना चमकायला स्टेशनची कमतरता होती वाटतं ?

**गणपतरावः**—मीं आपल्या अपत्याचें मन सुसंस्कृत करण्यानिमित्त भाषण करीत आहें. ( खिशांतून एक चोपडी काढून ) ही घे विद्या. मीं तुझ्यासाठीं एक छोटीशी वही विकत घेतली आहे.

**विद्याः**— कशाला ती ?

**गणपतरावः**— एका बाजूला रोजचा खर्च व दुसऱ्या बाजूला आपले अनुभव व विचार यांची नोंदणी करण्यासाठीं.

**विद्याः**— कसले अनुभव नी कुठले विचार ?

**गणपतरावः**— प्रवासांतील ! मीं तोंडानें सांगेन आणि तूं उतरून घे.

**सरस्वतीः**— आतां काय स्वतःला लेखक म्हणवून घ्यायचं आहे वाटतं ?

**गणपतरावः**— लेखक हा शिक्का स्वतःवर मारून घेतल्याखेरीज काय कुणाला आपले अनुभव व विचार एका वहींत टिपून ठेवतां येत नाहींत ?

**सरस्वतीः**—वाहवा ! तें काय विचारायचं ! फारच वाचण्यालायक होईल ती वही.

**गणपतरावः**—( स्वगत ) जेवणानंतर वामकुक्षी बुडाली कीं स्वारी अशीच धुसफुसत असते.

**हमालः**—( ट्रंकांनीं भरलेली एक हातगाडी ओढीत ) महाराज ह्या आपल्या ट्रंका ब्रेकमध्यें घालायच्या कीं काय ?

**गणपतराव**:–अर्थात्; पण थांब जरा, मला एकदां सगळं सामान मोजूं दे. एक, दोन, तीन, चार, पांच, ही सहा, विद्या सात, आणि मीं आठ. एकंदर आठ नग.

**हमाल**:–( गणपतरावांच्या पाठीकडून त्यांनांच बोचक्याप्रमाणें उचलण्याचे हावभाव करून ) उचलारे उचला.

**गणपतराव**:–( धांवत ) चला चला उशीर होईल.

**हमाल**:–साहेब, तिकडे नाहीं, या बाजूला.

**गणपतराव**:–ठीक आहे. ( बायकोस व विद्येस ) एकलंत ना ग ? इथून मुळींच हालूं नका, नाहीं तर चुकामूक झाली कीं पंचाईत. ( हमालाच्या पाठीमागें गडबडीनें जातो. )

**विद्या**:–बिचारे बाबा, काय जिवाची धांदल धांदल करतात.

**सरस्वती**:–अगदींच भांबावल्यासारखे झाले आहेत. ( वसंतराव दाणी व त्यांच्या पाठीमागून डोक्यावर पेटी घेतलेला एक हमाल प्रवेश करितात ).

**वसंतराव**:–( आपल्याशींच ) कुठें जावें तें अजून कांहींच निश्चित होत नाहीं ! अरे तिच्या ! ( विद्येस पाहून ) अरे हीच ती. तरी मला वाटलंच. ( विद्येस नमस्कार करितो, तीही त्याला नमस्कार करिते. )

**सरस्वती**:–( विद्येस एकीकडे ) हा गृहस्थ ग कोण ?

**विद्या**:–जकातखान्यांत नेमलेले हे एक नवीन अधिकारी आहेत.

**सरस्वती**:–पण तुझी कुठली त्यांची ओळख ?

**विद्या**:–माझ्या गायन क्लासाला येतात ते.

**सरस्वती**:–अस्सं होय ( उत्सुकतेनें स्वगत ) सरकारी अधिकारी !

**वसंतराव**:–( अदबीनें पुढें येऊन ) आपली भेट होण्याचा अचानक सुयोग आल्यानें मला परमानंद होत आहे. आपण प्रवासाला निघालां आहांत ?

**सरस्वती**:—होय.

**वसंतराव**:—बहुतकरून मुंबईस जायचा विचार असेल.

**सरस्वती**:—नाहीं.

**वसंतराव**:—मग खास पुण्यासच.

**सरस्वती**:—पुण्यासही नाहीं.

**वसंतराव**:—आपला विनाकारण वेळ घेतल्याबद्दल क्षमा करावी. प्रवासांत जर आपल्या उपयोगीं पडण्याची सुसंधी मिळाली तर मीं स्वतःला फार भाग्यवान समजेन.

**हमाल**:—सरकार, आपल्या सामानाची लवकर व्यवस्था लावावी. गाडी सुटायची वेळ आली.

**वसंतराव**:—चल आलोंच. ( दोघींना नमस्कार करून चालूं लागतो.) ( स्वगत ) तिकिट घ्यायच्या आधीं मंडळी कुठें जाणार आहेत याचा सुगावा लागला असता तर बरें झालें असतें. कांहीं फिकीर नाहीं, मनमाडच्या गाडीनें निघत आहेत खास. सध्यां एवढीच माहिती पुष्कळ झाली. ( जातो ).

**सरस्वती**:—( विद्येस ) गृहस्थ फारच देखणा व सभ्य दिसतो आहे.

( माधवराव साठे हातांत एक बॅग घेऊन येतात )

**माधवराव**:—( हमालास ) माझी ट्रंक ब्रेकमध्यें टाक. मीं येतोंच आतां. ( विद्येस पाहून ) अरे तीच ही. ( तिला नमस्कार करितो. तीही त्याला नमस्कार करिते )

**सरस्वती**:—( विद्येस, एकीकडे ) आणि हा ग कोण दुसरा गृहस्थ ?

**विद्या**:—हे बँकेचे एक नवीन डायरेक्टर आहेत.

**सरस्वती**:—( खोंचून ) हेही तुझ्या गायन क्लासाला येत असतात वाटतं ?

**विद्या**:—होय आई.

**सरस्वती**:–इथें काय गायनशाळेची बैठक व्हायची आहे कीं काय?

**माधवराव**:–( हळुहळु पुढें येऊन ) आपली भेट होण्याचा हा अचानक सुयोग आल्यानें मला परमानंद होत आहे. आपण प्रवासाला निघाला आहांत ?

**सरस्वती**:–होय.

**माधवराव**:–बहुतकरून मुंबईस जायचा विचार असेल.

**सरस्वती**:–छे.

**माधवराव**:–मग खास पुण्यासच—

**सरस्वती**:–पुण्यासही नाहीं. ( आपल्याशीं ) अगदीं हुबेहुब तोच नमुना.

**माधवराव**:–आपला विनाकारण वेळ घेतल्याबद्दल क्षमा करावी. प्रवासांत जर आपल्या उपयोगीं पडावयाची सुसंधी मिळाली तर मीं स्वतःला फारच धन्य समजेन. ( दोघींना नमस्कार करून चालूं लागतो.)

**सरस्वती**:–अगबाई, मासले तर अगदीं एकच आहेत.

**माधवराव**:–( स्वगत ) मंडळी कुठें जाणार याचा कांहीं अंदाज नाहीं लागला. चला आधीं एकदां सामानाचा बंदोबस्त करूं, मग यावं फिरून ( जातो. )

**सरस्वती**:–बँकेचा डायरेक्टर ! बराच श्रीमंत असला पाहिजे ! अग पण ह्यांची कुठें तंद्री लागली आहे ? माझे तर पाय मोडण्याची वेळ आली.

**गणपतराव**:–( गडबडीनें प्रवेश करून दूर कोणाशीं बोलत ) ठीक आहे, प्रथम तिकिटें काढलीं पाहिजेत ? उत्तम. ( तिकिट ऑफिसच्या खिडकीशीं ) मास्तरसाहेब, प्रथम तिकिट दाखवल्याखेरीज माझं सामान ब्रेकमध्यें घेत नाहींत.

**तिकिट मास्तर**:–तिकिट ऑफिस अजून उघडलें नाहीं, जरा थांबा.

**गणपतराव**:–आतां हद्द झाली; इथें सांगतात, थांबा वेळ आहे, आणि तिकडे सांगतात, आटपा उशीर झाला. ( घाम पुसून ) छे, माणसाला वेडच लागायचं.

**सरस्वती**:–आणखी किती वेळ लागणार आपलं आटपायला ?

**गणपतराव**:–जरा थोडा धीर धरावा कीं नाहीं माणसांनीं. तुमचं काय ? चांगलं जागच्या जागीं ऐटींत बसायला मिळतं आहे. नाहींतर माझ्या जिवाची पहा किती धांवपळ.

**सरस्वती**:–तुम्हींच सांगितलंत कीं या जागेवरून हालूं नका आणि आतां आपणच कुरकुर करतां आम्ही एके ठिकाणीं बसून राहिलों म्हणून.

**गणपतराव**:–अरे पण–

**सरस्वती**:–पुरे झाली तुमची महाबळेश्वरची यात्रा.

**गणपतराव**:–जेवणानंतरची वामकुक्षी बुडाली कीं–बरं बसा स्वस्थ आरामांत.

**सरस्वती**:–होय, पण आपलं आटपा एकदां लवकर.

**गणपतराव**:–होय, तें पहा उघडलंच तिकिट आफिस ( धांवत जाऊन पांचसहा माणसांना ढकलून सर्वांच्या पुढें तिकिटें काढायला जातो. )

**एक गृहस्थ**:–अहो महाराज, जरा पायाखालीं पाहून चालावं.

**तिकिट मास्तर**:–सर्वांनीं आपापल्या पाळीनं तिकिटें घ्यावींत. पाठीमागून पुढें घुसूं नये.

**गणपतराव**:–( पुटपुटत, कुरकुरत ) अरे रामा ! माझं सामान, माझी मंडळी. ( वांकडें तोंड करून रांगेच्या शेवटीं जाऊन उभा राहतो. )

( समशेर बहादुर संभाजीराव भोंसले व त्यांची पेटी घेऊन त्यांचा नोकर रामू प्रवेश करितात. )

**संभाजीरावः**—काय रामू, समजलंना नीट ?

**रामूः**—जी, हुजूर.

**संभाजीरावः**—तिनें जर विचारलं, मीं कुठें गेलों आहे, केव्हां परत येईन, तर तूं आपलं एक उत्तर दे " मला माहीत नाहीं. " फिरून कधीं तोंड नाहीं बघणार तिचं.

**रामूः**—जी हुजूर.

**संभाजीरावः**—तूं सांग मेहरजानला कीं आतां सर्व आटोपलं, कायमचं आटोपलं.

**रामूः**—जी हुजूर.

**गणपतरावः**—( लगबगीनें पुढें येत ) तिकिटं मिळालीं, चला जलदी सामानाचा बंदोबस्त लावूं; काय नसता उपद्व्याप महाबळेश्वरला जायचा. ( धांवत धांवत जातो. )

**संभाजीरावः**—सगळं ठीक ध्यानांत राहील ?

**रामूः**—हुजूरच्या परवानगीनें बोलण्याचें धाडस करतों. आपल्या जाण्यापासून कांहीं फायदा होणार नाहीं.

**संभाजीरावः**—कां नाहीं होणार ?

**रामूः**—कारण परत येतांक्षणींच हुजूर मेहरजानकडे जातील.

**संभाजीरावः**—वा !

**रामूः**—म्हणून म्हणतों तिला सोडून न गेलेलेंच बरें. कारण भांडणानंतर समेट करण्यानें हुजूरच्या खिशाला नेहमीं बराच चट्टा लागतो.

**संभाजीरावः**—छे छे! पण ह्या वेळची गोष्ट वेगळी आहे. मेहर माझ्या प्रेमाला व औदार्याला सर्वथैव अपात्र झाली आहे.

**रामूः**—प्रत्येक वेळेस आपण हेच उद्गार काढतां, व प्रत्येक वेळीं आपण फिरून आपला हात खिशांत घालतां. तिच्यामुळें आपलं दिवाळं निघायची वेळ आली आहे. आज सकाळीं आणखी एक सोनार पैसे वसूल करायला आला होता. गुळाच्या ढेपेला जसे मुंगळे लागले आहेत.

**संभाजीराव:**–मीं परत आल्यावर सर्वांना पाहून घेईन.

**रामू:**–सलाम, हुजूर.

**संभाजीराव:**–( तिकिट ऑफिसपर्यंत जाऊन परत येतो ) महाबळेश्वराला पत्र लिही आणि तुझी प्रकृती कशी आहे ती मला कळीव.

**रामू:**–माझी प्रकृती ! हुजूरची फारच कृपा आहे.

**संभाजीराव:**–माझ्या जाण्यानें कुणाला किती दुःख झालें, कुणी किती अश्रु गाळले याचीही वर्दी दे.

**रामू:**–तें कोण महाराज ?

**संभाजीराव:**–दुसरें कोण ? मेहर.

**रामू:**–( डोकें हालवीत ) आपण फिरून तिला घरांत घेणार, हुजूर.

**संभाजीराव:**–उंबरठा नाहीं फिरून चढूं देणार.

**रामू:**–ही आठवी खेप. आपल्या सारख्या सज्जन माणसाच्या घरीं धरणं धरून बसलेले दहा बेलीफ पाहिले कीं माझ्या पोटांत भडभडून येतं, आणि तें कोणासाठीं, दीडदमडीच्या—

**संभाजीराव:**–( रागावून ) हं बस कर, लहानातोंडीं मोठा घांस घेऊं नको. माझी बॅग दे आणि आज किंवा उद्यां कार्ड टाकायला विसरूं नको. रामराम. ( जातो ).

**रामू:**–सर्व नीट संभाळून घ्याव, हुजूर. ( स्वतःशीं ) आठ दिवस स्वारीला दूर राहवलें तर शपथ. आवांच्यामुळें पुरुष कसे लोण्यावाणी मऊ होतात ( जातो )

**सरस्वती:**–( विद्येसह बांकावरून उठून ) माझे बसून बसून पाय आंखडले बाई.

**गणपतराव:**–( गडबडीनें प्रवेश करून ) सुटलों बुवा. ही सामानाची पावती लागली एकदां हातीं.

**सरस्वती:**–नशीबच म्हणायचं.

**हमालः**–महाराज, सामान आणण्याबद्दल गरिबाला—

**गणपतरावः**–अरे हो. थांब जरा. ( बायको मुलीची सल्लामसलत घेत ) त्याच्या हातावर किंतीची चिरीमिरी दिली पाहिजे ? एक आणा ?

**सरस्वतीः**–दोन.

**विद्याः**–चार.

**गणपतरावः**–देतों झालं चार. ( हमालास पैसे देतो ) हे घेरे बाबा.

**हमालः**–सलाम हुजूर. ( जातो. )

**सरस्वतीः**–जायचं का आतां आंत ?

**गणपतरावः**–एका क्षणभरांत. विद्या, वही काढ तुझी, आणि उतरून घे मी सांगतों तें.

**सरस्वतीः**–झाली सुरवात.

**गणपतरावः**–खर्च. टांगा सहा आणे, तिकिटें, चव्वेचाळीस रुपये चार आणे, हमाल चार आणे.

**विद्याः**–हं झालं लिहून बाबा.

**गणपतरावः**–आतां अनुभव व विचार.

**सरस्वतीः**–शिकस्तच झाली म्हणायची.

**गणपतरावः**–तारीख १४ मे. बादशहा औरंगजेबाच्या देहस्थाना, तुला माझा शिरसाष्टांग नमस्कार. इ. स. १७०७ सालीं स्थापित झालेल्या अतिपुराण निजामशाही, हिंदुस्थानांतील सर्व महन् संस्थांना, तुला पंधरा दिवसानिमित्त सोडून परगांवीं जाण्याचें माझ्या अतोनात जिवावर येत आहे. अरे तिच्या, माझी छत्री कुठें गेली ? राहिली वाटतं तिकडे. ( धांवत जायला निघतो. सरस्वती त्याचें उपरणें धरून त्याला थांबविते. )

**सरस्वतीः**–अहो, चाललांत कुठें. ही माझ्याजवळ आह छत्री.

**गणपतरावः**–खरंच कीं.—( विद्येस ) हं कुठपर्यंत लिहिलंस ? इ. स. १७०७ सालीं स्थापित झालेल्या अतिपुराण निजामशाही–( घंटा वाजते. गाडी येते. उतारू गडबडीनें धांवूं लागतात. )

**सरस्वतीः**-अगबाई, यांच्या अनुभवांच्या आणि विचारांच्या पायीं गाडी चुकायची.

**गणपतरावः**-चला चला. डब्यांत चढूं आणि मग विचारांचें टिपण पुढें चालवूं. ( धांवत प्लॅटफॉर्मवर शिरावयास घुसतो. तिकिट कलेक्टर त्याला अडवतो व तिकिटें कुठें आहेत म्हणून विचारतो. गणपतराव पागोटें काढून शोधूं लागतात, व बायकोमुलीवर तिकिटें सांपडत नाहींत म्हणून धुसफुसतात. अखेरीस विद्या त्यांच्या खिशांतून तिकिटें हुडकून काढते. तिघेजण प्लॅटफॉर्मवर जातात.)

## प्रवेश दुसरा.

( वसंतराव तिकीट घेऊन येतात. माधवराव तिकीट घेण्यास जातात. दोघांची टक्कर होते ).

**वसंतरावः**-पहायचें एकीकडे आणि चालायचें दुसरीकडे !

**माधवरावः**-आपण जसें काय नाकासमोरच पाहून चालला होतां. दुसऱ्याला नांव ठेवायला—

**वसंतरावः**-( वर बघून ) अरे माधव !

**माधवरावः**-अरे लेकाचा वशा !

**वसंतरावः**-कुठे चालली आहे स्वारी मजा मारायला ?

**माधवरावः**-खरं सांगतों. अजून माझं मलाच माहीत नाहीं. प्रथम मनमाडपर्यंतचं तिकीट घेण्याचा विचार आहे.

**वसंतरावः**-काय चमत्कार ! हें बघ मींही बरोबर मनमाडपर्यंत-चंच तिकीट घेतलं आहे. हें अति उत्तम झालें. प्रवासांत आयतीच छान सोबत झाली.

**माधवरावः**-हो. पण मनमाडच्यापुढें काय ? का तिथेच सरकारच्या हुकुमाची वाट पहात बसणार ?

**वसंतराव**:–छे छे. सरकारचा कांहीं संबंध नाहीं. ही माझी खाजगी रजा आहे. म्हटलं टाकावी घेऊन, नाहींतर बुडायची.

**माधवराव**:–अस्सं अस्सं. पण कुठें जायचा विचार आहे सांगशील कीं नाहीं, बेट्या ? लपवून कां ठेवतोस ?

**वसंतराव**:–लपवून कुठें ठेवतोंय ? माहीत नाहीं म्हणतों तर !— चोराच्या मनांत चांदणें; तूंच सांगेनास कुठें जायचा बेत केला आहेस तो ?

**माधवराव**:–अजून बेत व्हायचा आहे. प्रकरण जरा नाजूक आहे. फार सावधगिरीनें वागलें पाहिजे, नाहीं तर सगळंच बिनसायचं.

**वसंतराव**:–कमाल आहे बुवा तुझ्यापुढें ! लागलास फिरून बहुत-करून एका पोरीच्या नादाला. हा कितवा नंबर ? सांग तर खरं, कोण, कुठली, नांव, गांव.—

**माधवराव**:–अरे पण हो. किती भडिमार करशील प्रश्नांचा ? तुला माहीत आहे ती मुलगी. आपल्या गायन क्लासांत येते रोज.

**वसंतराव**:–( गंभीर मुद्रा करून ) कोण, विद्या शहाणे ?

**माधवराव**:–होय, कसं बरोबर ओळखलंस ? पण एकदम तुझं तोंड उतरायला काय झालं ?

**वसंतराव**:–( नाखुषीनें ) हें बघ, माधव तूं या मुलीचा नाद सोड.

**माधवराव**:–तो कां रे बाबा ?

**वसंतराव**:–तुला काय, सगळ्या पोरी सारख्याच. आज हिच्याकडे पाहून दांत विचकतोस. तर उद्यां दुसरीच्या मागें लागशील.

**माधवराव**:–अरे पण तुला कोणी एवढा तिचा पाठीराखा नेमला आहे ? तूं उडव तुझे घोडे. तुला कशाला पोरींची उठाठेव ? का तुलाही केलें आहे मदनानें विव्हळ ?

**वसंतराव**:–हें बघ, मला कांहीं तुझी फाजील थट्टा आवडत नाहीं. माझं खरं खुरं त्या मुलीवर प्रेम बसलं आहे, आणि या प्रवासांत तिच्या

आईवडिलांची ओळख करून घेऊन तिला लग्नाची मागणी घालायचा माझा विचार आहे. म्हणून शर्यतींचा मोसम असूनही मी या प्रवासाच्या नादीं लागलों आहें. तेव्हां म्हणतों, कृपा करून तूं तिचा नाद सोड.

**माधवराव:**– वहावा, वसंतराव, वकिली तर खूप केलीत. पण विद्या शहाणेविषयीं माझ्याही मनांत दुसरा तिसरा विचार नसून तिच्याशीं विवाह करण्याचाच माझा उद्देश आहे.

**वसंतराव:**– ( हिरमुसलें तोंड करून ) पण आपणा दोघांशीं कसं तिचं लग्न होऊं शकेल ?

**माधवराव:**– हा एक प्रश्नच आहे. अद्यापपर्यंत बायकांना दोन नवरे करण्याचा हक्क हिंदुस्तानांत तरी मिळाला नाहीं.

**वसंतराव:**– मग करायचं कसं ?

**माधवराव:**– हें पहा, मीं सांगतों. आतां घेतलीच आहे दोघांनीं रजा, तेव्हां जाऊं दोघे मजेंत प्रवासाला, आणि दोघेही तिचं मन ओढून घेण्याचा प्रयत्न करूं.

**वसंतराव:**– मग काय म्हणतोस चढाओढच लागायची आपल्या दोघांत ?

**माधवराव:**–पण खरोखरीच्या धर्मयुद्धाच्या अटी पाळल्या पाहिजेत, आणि आपल्या मैत्रींत कांहीं बिघाड होऊं देतां कामा नये. जर तूं जिंकलंस तर मीं मुकाट्यानें आपला पराभव सोशीन, आणि जर मीं विजयी झालों तर तूं माझा द्वेष करतां कामा नये. कबूल ?

**वसंतराव:**–कबूल.

**माधवराव:**– दे वचन ( टाळी मारतात ).

**गणपतराव:**–( धांवत ) मीं सांगतोंना तुला कीं अजून वेळ आहे म्हणून. पान विकत घ्यायला असा किती वेळ लागणार ? जेवल्यापासून तोंडांत सुपारी नाहीं पडली. चुकचुकल्यासारखें होत आहे. ( एका पानवाल्याजवळ पानें विकत घेतो व त्यांतील एक तोंडांत टाकतो. )

**माधवराव**:—आपले श्वशूर.

**वसंतराव**:—जायचं त्यांच्या पाठीमागें ?

**माधवराव**:—न जाऊन कुणाला सांगशील ? आपल्याला कुठें जावं लागणार आहे त्याचा तरी पत्ता लागला पाहिजे कीं नाहीं ? ( गणपतरावांच्या पाठीमागें डब्यांत चढतात. उतारूंची गडबड. शिटी वाजते. गणपतराव खिडकींतून डोकें बाहेर काढतात. त्यांचें पागोटें खालीं पडूं लागतें. विद्या त्याचा एक पदर धरून तें बचाविते. दुसऱ्या खिडकींतून वसंतराव व माधवराव बाहेर डोकावीत विद्येकडे पाहतात. )



# अंक दुसरा

## प्रवेश पहिला

( महाबळेश्वरांतील सुखनिवास हॉटेल. वसंतराव, माधवराव व हॉटेलचा मॅनेजर. वसंत व माधव एका टेबलाजवळ बसून चहा पीत आहेत. )

**मॅनेजरः**–आणखी आपल्याला काय आणूं ?

**माधवरावः**–कांहीं वेळानें थोडीं गरम गरम भजीं पाठवून द्या. ( वसंतरावास ) बोल, काय नवलविशेष ?

**वसंतरावः**–तूंच कांहीं खबरबात सांग.

**माधवरावः**–नवीन काय सांगणार ? हल्लयाला सुरवात तर मारे जोरानें झाली आहे. बाबासाहेबांच्या डब्यांत चढल्यापासून लागलों आहे त्यांच्या खुशामतीस आणि बसलों आहे सारखा त्यांचा शब्द झेलीत ! गाडींत काय ऊठबस करायला लावली श्वशुरांनीं ? ही खिडकी उघड, त्या स्टेशनाचं नांव पहा, हा दिवा लाव, तो पंखा बंद कर, सारखा भोगीत होतों सासुरवास.

**वसंतरावः**–आणि मीं मनमाडास उतरून मुद्दाम त्यांच्याकरितां चित्र-मयजगत्चा खास अंक विकत घेतला. पण बाबा काय, गाडी सुरू होतां-क्षणींच कानटोपी चढवून त्या अंकाला कुशींत घेऊन घोरूं लागले. तथापि माझ्यावर ताण तूं केलीस. श्वशुरांना खूष करण्याच्या उद्देशानें व्याजाचा वाटेल तो दर कबूल करून निष्कारण त्यांच्याकडून पैसेही उसने घेतलेस.

**माधवरावः**–तूं काय कमी आहेस ? दोन्ही बाजूंनीं तूं गोळीबार चालवला आहेस. सासूबाईच्याही तैनातीस लागला आहेस. त्यांची

वळकटी सोड, चाळशी हरवली कीं हुडकून काढ, संत्रीं, केळीं विकत घे, पाण्याचा तांब्या ताज्या पाण्यानें भरून आण, काय हजारों उपद्व्यापांच्या भानगडींत पडतोस.

**वसंतरावः**–हे सगळे बुरुजावरचे हल्ले झाले. परंतु बालेकिल्ल्याचा तर थांगही लागत नाहीं. औरंगाबाद सोडल्यापासून तीन वेळां मान वर करून पहाण्यापलीकडे कांहींच जास्ती केलं नाहीं राणीसाहेबांनीं.

**माधवरावः**–तीन वेळां ? माझ्याकडे तिनं पांच वेळां पाहिलंन्.

**वसंतरावः**–( घाबरून ) काय म्हणतोस ? मग प्रकरण रंगांत येत चाललं म्हणायचं ?

**माधवरावः**–अरे इतक्यांत कसला राग आणि कसला रंग घेऊन बसतोस ? कांहीं दिवसांनीं बघ कुणाकडेच मुळीं ढुंकून बघायची नाहीं. मग चढेल खरा रंग. अशी चाळवील दोघांना ! मला सगळ्या युक्त्या माहीत आहेत पोरींच्या.

**वसंतरावः**–( भोंवतालीं बघून ) शहाणे महाराज अजून कां बरं उगवत नाहींत ? का झाला आहे कांहीं फेरबदल त्यांच्या दिनक्रमांत ? समजा गेली शिकार आपल्या हातून निसटून तर ?

**माधवरावः**–मोठी पंचाईत व्हायची. गृहस्थ मोठा लहरी आहे. परवां गेलों कीं आपण प्रतापगडावर रखडत त्यांच्या शोधार्थ–

**वसंतरावः**–आणि स्वारी गेली होती जुन्या महाबळेश्वरीं.

**माधवरावः**–याच लपंडावांत मजा आहे आणि काय ! ( वसंत उठून अस्वस्थ मनानें सभोंवार पहातो ) कुठें, चाललास कुठें ?

**वसंतरावः**–मला चैन पडंनासं झालं आहे. मीं जातों मायलेकींच्या शोधाला.

**माधवरावः**–आणि गरम भजीं मागितलीं आहेत तीं ?

**वसंतरावः**-खा तूंच ! ( चिंताक्रांत ताड करून निघून जातो )

**माधवराव**:-काय नामी माणूस आहे ! स्वभाव किती उदार ! परंतु आधीं पोटोबा मग विठोबा हें कांहीं लेकाला कळत नाहीं. चांगलीं गरम गरम भजीं सोडून-( हाका मारीत ) अरे ए. भज्यांचं काय झालं ?

**हॉटेलचा नोकर**:-( भज्यांची बशी टेबलावर ठेवीत ) हीं आण-लींच, साहेब.

**माधवराव**:-( पाय वसंताच्या खुर्चीवर पसरून ) ही खुर्ची जरा जवळ कर बरं. हं पुरे. बिचारा वसंत! भर उन्हांत हिंडत असेल इकडून तिकडे चुकल्या वांसरा सारखा. नाहीं तर मी पहा कसा स्वस्थपणें पाय लांब करून पडून राहिलों आहें. शर्यत कोण जिंकतं तें दिसेलच. सशाची आणि कांसवाची गोष्ट आहेच जगजाहीर.

**हॉटेलचा मॅनेजर**:-( एक जाडें पुस्तक पुढें करून ) कदाचित् आपल्याला एकादी ओळ लिहिण्याची इच्छा असेल तर.

**माधवराव**:-हें काय प्रकरण ? शेरे बुक ! आपलं हॉटेल मला सर्व तऱ्हेनें फार पसंत आहे परंतु लिहिण्याच्या कामांत मीं अती मागासलेला आहे. ( पुस्तक चाळीत बसतो. इतक्यांत बाहेर गडबड ऐकूं येते. विद्या व वसंतराव गणपतरावास दोन्ही बाजूंनीं सांवरीत आणतात. सरस्वती हातांत त्यांचें उसकटलेलें पागोटें घेऊन येते. )

**वसंतराव**:-लवकर थोडें थंड पाणी, नाहींतर मिळाल्यास बर्फच—

**माधवराव**:-काय, झालं तरी काय ?

**विद्या**:-बाबांच्या जिवावरच बेतली होती.

**माधवराव**:-काय म्हणतां ?

**गणपतराव**:-( उठून बसून ) अग आई ग ! विद्या, आतां जरा बरं वाटतं आहे.

**विद्या**:-( पाण्याचें भांडें पुढें करून ) हें प्या थोडं म्हणजे बरं वाटेल.

**गणपतराव**:–( पिऊन ) अरे रामा, काय गाळण उडाली होती.

**सरस्वती**:–तरी मी सांगत होतं. या वयांत घोड्यावर बसायच्या भानगडींत कशाला पडावं ? तें तरी सुध्यासारखें बसायचं ! टांचेवर आर कुणी घालायला सांगितली होती ?

**गणपतराव**:–आरीशिवाय कोणी घोडेस्वार घोड्यावर बसला आहे ! ते घोडंच उधळणारं होतं. त्यांत आरीचा कांहीं संबंध नाहीं.

**सरस्वती**:–नाहीं कसा ! तुम्हीं नकळत त्याला टांच मारली असेल आणि काढला असेल त्यानें पाय.

**विद्या**:-जर वसंतराव प्रकट झाले नसते तर गेलेच होते बाबा दऱ्याखोऱ्यांत.

**सरस्वती**:–चाललेच होते गडगडत खालीं. मीं तर किंचाळाय-लाच लागलें.

**विद्या**:–इतक्यांत वसंतरावांनीं हरणासारखी खालच्या कड्यावर उडी मारून—

**सरस्वती**:–काय धैर्य व प्रसंगावधान पण ! वसंतराव, तुम्हीच आमचे प्राणदाते, तुमच्याशिवाय आज माझ्या कपाळचं कुंकू—( हुंदके देऊन रडूं लागते ).

**वसंतराव**:–आतां काय त्याचं ? उगीच कशाला डोळयांतून पाणी काढतां ?

**सरस्वती**:–( रडत रडत ) मन हलकं होतं हो रडून. (गणपतरावांस) आतां तरी धडा घ्यावा. बायको-पोरीची तुम्हांला काळजीच नाहीं.

**गणपतराव**:–वसंतराव, मला पुनरपि आपले मनःपूर्वक आभार मानूं द्या.

**वसंतराव**:–छे छे, त्यांत कसले आभार ?

**गणपतराव**:–मीं कांहीं वक्ता लागून गेलों नाहीं. परंतु जोंपर्यंत माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत मीं आपला ऋणी–(त्याला पोटाशीं घेतात.)

**माधवराव**:– ( स्वगत ) गरम भज्यांच्या मोहांत विनाकारण पडलों असं मला वाटायला लागलं आहे.

**सरस्वती**:–(गणपतरावास) जरा घटकाभर विश्रांति घ्यावयास चला.

**गणपतराव**:–होय, आंग जरा ठणकतंच आहे.

( गणपतराव, सरस्वती व विद्या जातात. )

**वसंतराव**:–झालेल्या प्रकाराविषयीं काय म्हणतोस सांग.

**माधवराव**:–म्हणणार काय कपाळ ? नशीब जोरावर आहे लेका तुझं अन् काय ? बाबांचा जीव काय बचावतोस, कड्यावर हरणासारख्या उड्या काय मारतोस, सगळं सोद्याच्या बाहेर झालं.

**वसंतराव**:–मीं काय सगळं रचून थोडंच ठेवलं होतं ?

**माधवराव**:–बाबा, तुला पोटाशीं घेतात, आई गंगायमुना गाळूं लागते आणि मुलगी तुझ्या करामतीचं काव्यमय वर्णन करते. आतां काय अक्षताच डोक्यावर पडायच्या बाकी राहिल्या आहेत. माझा पराजय झाला हें तर उघडच आहे. उचलतों आतां चंबूगबाळं आणि करतों पोबारा.

**वसंतराव**:–अरे उगीच काय ? थट्टा तरी किती करशील ?

**माधवराव**:– बरं बघशील आज संध्याकाळच्या मोटारनें जातों कीं नाहीं तो.

**वसंतराव**:–( आनंदानें ) मग काय खरंच जाणार म्हणतोस ?

**माधवराव**:–अगदीं मनापासून संतोष वाटतो आहे रे तुला.

**वसंतराव**:–माफ कर, माधव. तुझ्या स्वार्थत्यागानं मला उलटं खजील झाल्यासारखं वाटलं पाहिजे.

**माधवराव**:–माझा स्वार्थत्याग ? बस्स बस्स. उगीच बड्या बड्या शब्दांची कांहीं जरूरी नाहीं. मी यत्किंचितही स्वार्थत्याग करीत नाहीं. मला विद्येची प्राप्ति होण्याचा काडीइतकासुद्धां संभव नाहीं अशी माझी खात्री

झाल्यामुळेंच मीं जाण्याचें ठरवलें. आणखी सांगतों कीं जर अजूनही आशेला थोडीशी जागा आहे असं आढळून आलं तर जायचा बेत मी ताबडतोब रहीत करीन.

**वसंतराव:**–आं ?

**माधवराव:**–काय चमत्कार! विद्या जशी जशी माझ्या हातून निसटून जाऊं लागते तशी तशी ती मला जास्तच प्रिय होऊं लागते.

**वसंतराव:**–कसं पण हुबेहुब पटतं आहे मला. मग जाऊं दे तर— तुला एक विचारायचं मनांत आलं होतं पण नाहीं आतां विचारीत.

**माधवराव:**–काय तें ?

**वसंतराव:**–छे छे, कांहीं नाहीं.

**माधवराव:**–सांगशील तर खरं.

**वसंतराव:**–माझ्या आपलं मनांत आलं होतं—तूं जायचं नक्की ठरवलं होतंस म्हणून—कीं जायच्या आधीं शहाण्यांच्याजवळ जरा भद्रेश्वरी करायला तुला सांगायचं म्हणून.

**माधवराव:**–वहावा, अगदीं खूपच केलीस.

**वसंतराव:**–मला कसं माझ्याविषयीं बोलतां येईल ? आणि शिवाय मींच विषय काढला तर संकटांतून बचावण्याचा मोबदला मागतों आहें असं भासेल.

**माधवराव:**–गोळाबेरीज, मीं तुझ्याकरितां विद्येला मागणी घालावी असंच कीं नाहीं तुझं म्हणणं ? अजब आहे बुवा तुझी योजना !

**वसंतराव:**–मग काय नाहीं म्हणतोस ?

**माधवराव:**–शिंचा काय स्वार्थसाधु आहे. जाऊं दे पण. तुला नाहीं मला नाहीं, घाल कुत्र्याला, असं व्हायचं नाहींतर. ठीक आहे, पहातों मीं विचारून तूं म्हणतोच आहेस तर.

**वसंतराव:**–किती थोर आहे तुझं अंतःकरण माधव. मी तुझा कसा उतराई होऊं ?

**माधवराव**:-पुरे पुरे, जास्ती पाल्हाळ लावूं नकोस ( बाहेर गणपतरावांचा शब्द ऐकूं येतो ) ते बघ गणपतराव येत आहेत. चल पळ इथून आतां ( वसंत जातो ).

**गणपतराव**:-( येतां येतां ) कबूल कबूल. अतिशय परोपकारी माणूस आहे—

**माधवराव**:-कसं काय वाटतं आहे आतां आपल्याला ?

**गणपतराव**:-अगदीं खडखडीत बरा झालों म्हणाना ? ही घातली कोट टोपी आणि निघालों फिरून नीडलला; पण तुमचे स्नेही वसंतराव कुठें दिसत नाहींत ते.

**माधवराव**:-आतांच जरासे कुठें गेले आहेत.

**गणपतराव**:-गृहस्थ फारच भला आहे. माझ्या बायको-मुलींचा त्यांच्यावर अत्यंत लोभ जडला आहे.

**माधवराव**:-थोडी जास्त ओळख झाल्यावर त्यांचा अधिकच लोभ बसेल. कर्णासारखा उदार, धर्मासारखा सत्वशील, आणि इतकं असूनही विलक्षण विनयशील.

**गणपतराव**:-लाखांत माणूस आहे म्हणायचा.

**माधवराव**:-त्यांच्यामुळें आज आपली सुटका—

**गणपतराव**:-बरोबर, मीं त्यांचा आजन्म ऋणी झालों आहे. तरीपण तुमच्या आमच्यांत सांगतों कीं जितके माझ्या बायकोमुलीस वाटतात तितके कांहीं वसंतरावांनीं माझ्यावर उपकार केलेले नाहींत.

**माधवराव**:-काय म्हणतां ?

**गणपतराव**:-त्या दोघी बरीच अतिशयोक्ति करीत आहेत-**पण त्या काय**, बोलून चालून बायकाच.

**माधवराव**:-तरी पण वसंतरावांनीं जेव्हां तुम्हांला अडवलं तेव्हां घसरतच होतांना तुम्ही खालीं ?

**गणपतराव**:–कबूल. परंतु मीं विलक्षण प्रसंगावधान राखून उतारावरच असलेल्या एका झाडावर नजर ठेवून त्याला पकडून स्वतःला सांवरणार होतों. लागलंच होतं तें झाड माझ्या हाताला.

**माधवराव**:–( स्वगत ) बघा बघा. क्षणार्धांत स्वारी म्हणूं लागेल कीं आपण स्वतःच स्वतःला बचावलं.

**गणपतराव**:–कांहीं झालं तरी वसंतरावांच्या मनांतील उदात्त हेतूची मीं जन्मभर वाखाणणीच करीत राहीन. गाडीवाला अजून कां बरं उगवत नाहीं ?

**माधवराव**:–आपण सर्व तयार आहांत ?

**गणपतराव**:–त्या दोघी मायलेकी येणार नाहींत. चला आपण दोघेच जाऊं.

**माधवराव**:–आणि वसंतराव ?

**गणपतराव**:–त्यांच्या मनांतून यायचं असेल तर माझी कांहीं ना नाहीं.

**माधवराव**:–( एकीकडे ) काय बेट्याचं नशीब. त्याच्या दैवाचं पारडं एकदम फिरलं असं दिसतं आहे. तेव्हां मी अजून येथून पाय काढीत नाहीं.

**हाटेल मॅनेजर**:–( शेरेबुक पुढें करून ) या वहींत जर मेहरबानी करून आपण एखादी ओळ लिहाल तर सुखनिवास आपला आजन्म ऋणी होईल.

**गणपतराव**:–जरूर लिहीन की. पण कांहीं तरी विशेष डोक्यांत आलं पाहिजे. एखादा सुंदर काव्यमय विचार.... ( पुस्तक परत करीत ) थोड्या वेळानें लिहीन. ( माधवरावास ) येतोंच मीं एका मिनिटांत.

( गणपतराव आपल्या खोलीच्या बाजूला जातात; वसंतराव बाहेरून आंत येतात. )

**वसंतराव**:–काय खबर, माधव ?

**माधवराव**:-( स्वगत ) गरीब बिचारा वसंत.

**वसंतराव**:-झाली मुलाखत ?

**माधवराव**:-होय.

**वसंतराव**:-मग सांगशील कीं नाहीं काय बोललाम तें.

**माधवराव**:-पुष्कळच बोलत होतों.

**वसंतराव**:-केलीस माझ्यासाठीं मागणी ?

**माधवराव**:-नाहीं.

**वसंतराव**:-कां नाहीं केलीस ?

**माधवराव**:-हें बघ, वसंत. सुरवातीपासून आपण एकमेकांशीं सरळ-पणं वागायचं ठरवलं आहे, तेव्हां सांगतों, मीं माझा जाण्याचा बेत रहीत केला आहे. तेव्हां सामन्याला फिरून सुरवात.

**वसंतराव**:-( आश्चर्यानें व निराशेनें ) मग गोष्टच वेगळी. परंतु एका एकीं कोणच्या कारणानें तुझा बेत बदलला हें विचारण्याला तरी कांहीं हरकत नाहींना ?

**माधवराव**:-कोणच्या कारणानें ? एक अति उत्तम कारण आहे. तें म्हणजे माझा विजय होईल अशी फिरून मला आशा वाटते आहे.

**वसंतराव**:-तुझा ?

**माधवराव**:-होय, माझा. मीं तिसऱ्याच एका मार्गानें पण उद्दिष्ट ठिकाणीं तुझ्या आधीं जाऊन पोचेन असा मला संभव वाटत आहे.

**वसंतराव**:-ठीक आहे. ( गणपतराव येतात ).

**गणपतराव**:-चला माझी तयारी झाली. अरे वसंतराव !

**वसंतराव**:-कसं काय वाटतं आहे आतां आपल्याला ?

**गणपतराव**:-उत्तम. त्या छोट्याशा अपघाताचं नांवच नको आतां काढायला. गेलों म्हणाना मी विसरून.

**माधवराव**:–( स्वगत ) पाताळांत जाऊन बसायची वेळ आली होती, आणि इतक्यांत गेलों म्हणे विसरून. कृतघ्नतेचा मूर्तिमंत अवतार आहे.

**गणपतराव**:–( वसंतरावास ) आम्हीं नीडलला निघालों आहोंत, आपल्याला यायचें असेल तर—

**वसंतराव**:–नको. मीं जरा किंचित थकलों आहे, तर आपण माफी करावी.

**गणपतराव**:–( उत्साहानें ) जरूर जरूर; त्यांत माफीचा कांहीं प्रश्न नाहीं. आपण स्वस्थपणें आराम करावा. ( हॉटेल मॅनेजरास ) अहो आतां आपलें शेरेबुक मला द्या.

**माधवराव**:–( स्वगत ) झाली वाटतं स्वारीला सुंदर काव्यमय विचारांची स्फूर्ति.

**गणपतराव**:–( लिहून ) हं, हें घ्या लिहिलं. ( ऐटींत वाचीत ) "शाहिस्तेखानाला ज्या गडावर श्री शिवाजी महाराजांनीं मुक्ती दिली असा इतिहासप्रसिद्ध प्रतापगड समोर सदोदित विलोकित असणाऱ्या सुखनिवास हॉटेलांत कोणत्या हिंदू पुरुषाला सुख लाभणार नाहीं ?"

**माधवराव**:–वाहवा ! काय विचार, काय भाषा !

**वसंतराव**:–( आपल्याशीं ) लाळघोटया.

**गणपतराव**:–( विनयानें ) सहज पहातां पहातां आलं डोक्यांत आणि लिहिलं झालं. तरीपण वाटेल त्याच्या डोक्यांत अशी कल्पना येण्याचा संभव नाहीं.

**माधवराव**:–( स्वतःशीं ) आणि इतिहासाचं इतकं अज्ञान असणंही शक्य नाहीं. गृहस्थानें लेखणीच्या एका फटकाऱ्यानें अफजुलखानाचा शाहिस्तेखान करून टाकला कीं.

**गणपतराव**:–चला वाटेला लागूं.

**माधवराव**:–हा मी तयारच आहें. ( दोघे निघून जातात ).

**वसंतराव:**—माधवांत एकाएकीं काय विलक्षण परिवर्तन घडून आलें आहे—असो, शहाण्यांच्या पत्नी येतीलच आतां, त्यांच्याच जवळ सरळ बोलणं काढावं. ( एका खुर्चीवर बसून एक वर्तमानपत्र वाचावयास लागतो. )

( समशेर बहादुर संभाजीराव व हॉटेल मॅनेजर प्रवेश करितात. संभाजीराव एका खुर्चीवर बसतात. जवळच्याच टेबलावर पडलेलें शेरेबुक त्यांच्या नजरेस पडतें. तें ते वाचीत बसतात )

**संभाजीराव:**—एक व्हिस्की आणि सोडा आणा.

**हॉटेल मॅनेजर:**—आणलाच हुजूर ( जातो. )

**संभाजीराव:**—" शाहिस्तेखानाला ज्या गडावर श्रीशिवाजी महाराजांनीं मुक्ती दिली असा इतिहासप्रसिद्ध प्रतापगड समोर सदोदित विलोकित असणाऱ्या सुखनिवास हॉटेलांत कोणत्या हिंदु पुरुषाला सुख लाभणार नाहीं ? गणपतराव शहाणे " शहाणाच दिसतो आहे बामण. शाळेंत जाऊन इतिहास शिक म्हणावं.

**हॉटेल मॅनेजर:**—( प्रवेश करून ) व्हिस्की सोडा, हुजूर.

**संभाजीराव:**—( शेरेबुकावर खरडीत ) आपल्या सुखनिवासांत वसंतराव दाणी म्हणून कोणी गृहस्थ उतरले आहेत काय ?

**वसंतराव:**—( मान वर करून स्वगत ) माझ्याशीं काय काम आहे बुवा या प्राण्याचं. ( मोठ्यानें ) माझंच नांव वसंतराव दाणी.

**संभाजीराव:**—रामराम. मीं औरंगाबादचा समशेरबहादुर संभाजीराव.

**वसंतराव:**—रामराम. आपली प्रत्यक्ष भेट झाल्याचं कांहीं माझ्या ध्यानांत येत नाहीं.

**संभाजीराव:**—देतों तर आपली ओळख पटवून. मागल्याच महिन्यांत मीं दोन काश्मिरी गालिच्यांवर जकात द्यायची चुकविल्याबद्दल आपण माझ्या शोधांत आहांत. मला कैदेंत घालायचाही आपल्याला अधिकार मिळाला आहे.

**वसंतराव**:–असेल कदाचित्. परंतु यांत माझा स्वतःचा कांहींच उद्देश नाहीं. मी काय हुकमाचा नोकर.

**संभाजीराव**:–मी कुठें नाहीं म्हणतों आहे ? तरीपण कैद चुकविण्याकरतां कांहीं मीं औरंगाबादेहून पोबारा केला नाहीं एवढंच आपल्याला सांगतों.

**वसंतराव**:–माझ्या असं कधीं स्वप्नांतही आलं नसतं.

**संभाजीराव**:–उलट मीं दहा पंधरा दिवसांत, कदाचित् आधीही, औरंगाबादेस माघारीं जाईन. तेव्हां जरूर आपण मला पकडून कैदेंत घालावं.

**वसंतराव**:–ही कसली भलतीच थट्टा ?

**संभाजीराव**:–छे छे, मीं बिलकूल थट्टा करीत नाहीं. उलट मला कैदखान्यांत टाकण्याची आपली मी हात जोडून प्रार्थना करतों.

**वसंतराव**:–असल्या अजब प्रार्थनेचा मला मुळींच उमज पडत नाहीं.

**संभाजीराव**:–पंचाईत झाली; आपल्याला स्पष्ट करून सांगण्याचा मला संकोच वाटतो. सांगतोंच तरी. मीं एका वेश्येच्या पाशांत गुंतलों आहें.

**वसंतराव**:–आपण ?

**संभाजीराव**:–होय; साठी बुद्धि नाठी म्हणतात ना ?

**वसंतराव**:–म्हणीमध्यें काय अर्थ आहे.

**संभाजीराव**:–माझ्याच्यानें कांहीं तिचा लोभ सोडवत नाहीं. सौंदर्य, तारुण्य, मोहकता, एकना हजारों बंधनांनीं मीं जखडून गेलों आहें. प्रथम म्हटलं होतं करूं चैन तीन दिवस, पण आज तीन वर्षे झालीं, जाळ्यांत अडकून पडलों आहें. ती माझा पैसा उधळते, माझ्या पाठीमागें वाटेल तशी मजा मारते. सारा दिवसभर मीं तिच्यासाठीं दागिने, लुगडीं, गालिचे, शाली विकत घेत असतों. लगेच दुसऱ्या दिवशीं तीं

सगळं विकून टाकून आलेले पैसे गट्ट करून मला नवीन विकत घ्यावयास लावते. तिचा नाद सोडण्याकरतां मीं औरंगाबादेहून महाबळेश्वरपर्यंत आलों. उद्यां सकाळपर्यंत माझ्याच्यानें येथें थांबवेलच अशी कांहीं मला खात्री देववत नाहीं. पुरता गुलामच बनलों आहें म्हणाना? ह्या वयांत असलं व्यसन म्हणजे दारूबाजाचीच अवस्था, कशानेंही सुटायचं नाहीं.

**वसंतराव:**–समशेरबहादुर, आपल्या खासगी गोष्टींचं इतकं स्पष्टीकरण करण्याची कांहीं जरूरी नव्हती. मीं आपल्यावर रुजु झालेल्या कैदेचा तपास करून जरूर कांहीं तरी तोड काढीन.

**संभाजीराव:**–आतां काय करावं? अहो मला स्वखुषीनं कैदेंत जायचं आहे. तिथें तरी कांहीं ती सटवी माझा पाठलाग करीत येणार नाहीं. कदाचित् ह्या उपायानें सुटेल म्हातारपणचं व्यसन. पाहूं तर खरं. झाला उपाय सफळ तर उत्तमच. निदान तोटा तरी कांहीं होणार नाहीं?

**वसंतराव:**–तरीपण—

**संभाजीराव:**–तरी नाहीं आणि पण नाहीं. मी औरंगाबादेस पोंचतांक्षणींच आपल्याला वर्दी देईन. आपण ताबडतोब आपले शिपाई पाठवावेत. येतों आतां. आपला बराच वेळ घेतला. रामराम ( जातो ).

**वसंतराव:**–रामराम, समशेर बहादुर. (स्वगत ) खूपच अजब चीज आहे बुवा. ( सरस्वती येते ) अरे ह्या पहा सरस्वतीबाई.

**सरस्वती:**–तुम्ही अद्याप येथेंच? मला वाटलं होतं तुम्हीं त्यांच्याबरोबर नीडळ पहाण्यास गेलां असाल.

**वसंतराव:**–गतवर्षी सर्व कांहीं पाहून झालें आहें. तेव्हां मीं गणपतरावांच्या परवानगीनें म्हटलं दोन घटका आपल्या सहवासांत व सेवेंत घालवाव्या.

**सरस्वती:**–आपली आमच्यावर फारच कृपादृष्टि आहे. ( स्वगत ) बोलणंचालणं गृहस्थाचं मोठं थाटांत आहे.

**वसंतराव**:–आपली महाबळेश्वरास यायची ही पहिलीच खेप कीं काय ?

**सरस्वती**:–नाहीं, पूर्वी मीं दोन वेळां माझ्या वडलांबरोबर येथें आलें होतें. माझं माहेर वाईला. तेव्हां जवळच होतं महाबळेश्वर.

**वसंतराव**:–वाईस ? ( स्वगत ) वाईचं काय बरं नातं जोडावं ? हो, आहेत आमचे कुणी लांबचे नातेवाईक वाईस, पिंगळे म्हणून. (मोठ्यानें) आपल्याला वाईचे पिंगळे माहीत असतील कदाचित् ?

**सरस्वती**:–पिंगळे, अगबाई, ते तर माझे सावत्र मामेभाऊ लागतात. आपली चांगली ओळख आहे वाटतं त्यांची ?

**वसंतराव**:–फारच दाट. ( स्वगत ) तोंडही कधीं नाहीं पाहिलं बेट्याचं.

**सरस्वती**:–बोलून चालून माणूस भारी होशी आहे.

**वसंतराव**:–तें काय विचारायचं ?

**सरस्वती**:–पण काय बिचाऱ्याचं दुर्दैव. सगळं सोन्यासारखं आहे, पण एकच कमी आहे.

**वसंतराव**:–( स्वगत ) काय कमी आहे बेट्याला ?

**सरस्वती**:–ऐन पंचविशींत डोळेच गेले आपले.

**वसंतराव**:–( स्वगत ) अरे तिच्या, आंधळे आहेत वाटतं आमचे मेव्हणे. तरीच नेहमीं खुशालीचें पत्र बायको पाठवते.

**सरस्वती**:–विद्या अजून खोलींत काय करते आहे ? वाटलं होतं जरा कुठें तासदीडतास पाय मोकळे करून यावं. आपल्याला महाबळेश्वरचा काना आणि कोंपरा माहीत आहे, तेव्हां सांगा येथें जवळपास कांहीं पहाण्यासारखं असेल तर.

**वसंतराव**:–अर्ध्यातासाच्या अंतरावर एक प्रेक्षणीय स्थळ आहे. आपली जर कांहीं हरकत नसली तर मीं आपल्याला वाट दाखविण्यास बरोबर येईन.

**सरस्वती**:-हरकत कसली, उलट छान सोबत होईल. परंतु आपण मागल्याच वर्षीं सर्व कांहीं पाहिलं आहे; तेव्हां आपल्यालाच कंटाळवाणं होईल.

**वसंतराव**:-मला कंटाळवाणं? घटकाभर आपल्या व आपल्या कन्येच्या सहवासांत घालवणं मला कंटाळवाणं होईल ? तिच्याकरतां मी महाबळेश्वरपर्यंत आलों. काशीपर्यंतही गेलों असतों. तिच्या व तिच्या मातोश्रींबरोबर—

**सरस्वती**:-आपण कोणच्या गोष्टीचा उल्लेख करीत आहां याचा मला उमज पडेनासा झाला आहे.

**वसंतराव**:-माफ करा, माझं भान जरा गेल्यासारखं झालं होतं ( स्वगत ) टाकूं का सांगून ? अशी संधि फिरून मिळायची नाहीं. ( मोठ्यानें ) आपल्या कन्येवर माझें तनमनधनपूर्वक प्रेम बसलें आहे. ज्या दिवशीं मीं त्यांना प्रथम पाहिलें त्या दिवसापासून माझ्या मनांत एकच विचार. मला कुठून तरी कळलें कीं आपला परगांवीं जाण्याचा बेत झाला आहे. मींही ताबडतोब रजा घेऊन आपल्याच गाडीनें तोच रस्ता धरला. पुढील सर्व आपल्याला माहीतच आहे.

**सरस्वती**:-म्हणजे आपण आमचा पाठलागच करीत आलां म्हणायचं.

**वसंतराव**:-थेट औरंगाबादेपासून. तेव्हां सांगा आपला जामात होण्याची मला कांहीं आशा आहे का ?

**सरस्वती**:-( भांबावून, स्वगत ) अगबाई, लग्नाचीच मागणी घालीत आहेत विद्येला, आणि हे गेले आहेत बाहेर. मी बायको माणूस काय करणार ? ( मोठ्यानें ) हे गेले आहेत बाहेर, परत येतां क्षणींच—

**विद्या**:-( येतां येतां ) ही झाली माझी तयारी. कुठें जायचं ?

**सरस्वती**:-( स्वगत ) मला माहीत असतं तर विद्येला नवीन पातळ पोलकं काढून दिलं असतं पेटींतून.

**विद्याः**–सांगशील कीं नाहीं कुठें जायचं तें ?

**सरस्वतीः**–( गांगरून ) हो खरोखरच मला ऐकूं नाहीं आलं. वसंतराव आपल्याला एक सुंदर स्थळ पहावयास नेत आहेत.

**विद्याः**–( आनंदानें ) वा, मग तर मजाच झाली ( तिघें जातात ).

## प्रवेश दुसरा.

( सरस्वती, विद्या व वसंतराव संध्याकाळीं फिरून हॉटेलांत येतात. )

**सरस्वतीः**–देखावा फार रमणीय होता.

**विद्याः**–आकाशांतील चित्रविचित्र रंगांमुळें सृष्टिसौंदर्यांत अधिकच भर पडली होती, नाहीं का वसंतराव ?

**वसंतरावः**–माझं सर्व लक्ष आपल्या मधुर गाण्यानें वेधलं होतं. आकाशांतील रंग माझ्या नजरेस आले नाहींत व आजूबाजूचे पर्वतही मला दिसले नाहींत ( विद्या जरा लाजून हंसते )

( बाहेर गडबड ऐकूं येते. गणपतराव व हॉटेलचा मॅनेजर माधवरावांना खांद्यावरीन घेऊन येतात. घोडेवाला पाठीमागून एक भला मोठा साप घेऊन येतो.)

**गणपतरावः**–लवकर थोडें आयोडीन घेऊन या.

**सर्वः**–काय झालं ? कसली गडबड ?

**गणपतरावः** कांहीं विचारूं नका. ( थांबून ) माधवराव ही ब्रँडी. ( माधवरावांचें तोंड उघडून त्यांना ब्रँडी पाजतो )

**माधवरावः**–अरे देवा देवा, आतां जरा बरं वाटतं.

**वसंतरावः**–काय रे, कुठें पडलास कीं काय ?

**माधवरावः**–(कण्हत) गणपतराव नसते तर-(घोडेवाल्याच्या हातांतील सापाकडे बोट दाखवितो. )

**स. व विद्याः**–( किंचाळत ) अगबाई, साप !

**माधवरावः**–गणपतराव नसते तर–

**गणपतराव**:-( जोरानें ) अंहं, बोलण्याचे श्रम घेऊं नका. काय विलक्षण अपघात तरी. आम्ही परत येत होतों, माधवराव जरा पुढें गेले होते. गाडी सुमारें दोनशें यार्डांवर उभी होती. इतक्यांत कांहीं अंतरावर माधवराव विव्हळत ओरडत असलेले ऐकूं आले. सूर्य नुकताच अस्तास गेला होता. आकाश तांबडें लाल झालें होतें.

**सरस्वती**:-पण पुढें काय सांगा लवकर.

**गणपतराव**:-अग, पण हो. आकाश तांबडें लाल झालें होतें, पक्षी किलबिल करूं लागले होते, ज्या दिशेकडून माधवरावांच्या काकुळतीच्या किंकाळ्या ऐकूं आल्या तिकडे पाहिलें तों माधवराव ह्या काळ सर्पानें वेटाळलेले मला दिसले.

**सरस्वती**:-अरे देवा !

**गणपतराव**:-एखाद्याचें पाहूनच काळीज बंद पडलें असतें. परंतु मीं बायकोपोरींचा किंवा स्वतःच्या जिवाचा विचार न करतां वेगानें निघून त्यांच्याजवळ येऊन ठेपलों. पायाला लागलें होतें म्हणून बूटही काढून हातांत घेतले होते.

**सरस्वती**:-फारच विद्वान्! आपलाच एखाद्या जिवाणूवर पाय पडला असता म्हणजे ?

**गणपतराव**:-माधवरावांचे डोळे अर्धे मिटलेले होते. मीं विलक्षण प्रसंगावधान राखून न डगमगतां माझें पिस्तूल बाहेर काढून सपासप त्या यमदेवावर गोळ्या झाडल्या.

**सरस्वती व विद्या**:-शाबास.

**गणपतराव**:-चारपांच आंचके देऊन तो साप आ वासून पडला. घोडेवालाही आरोळ्या ऐकून तेथें येऊन पोंचला होता. माधवरावांना त्या काळपुरुषाच्या विळख्यांतून सोडवून त्यांची जखम मीं चोखिली. सर्व

विष चुंफून थुंकून टाकून त्यांनां गाडींत घालून हे घरीं आणले, व तुम्हां सर्वांस दाखवावयास हा सापही बरोबर आणला आहे.

( सर्वजण आश्चर्यस्तब्ध होतात. )

**सर्वः**–धन्य आहे तुमची.

**गणपतरावः**–( विद्येच्या खांद्यावर हात ठेवून ) जन्मास येऊन आज सार्थक झालं असं वाटतं.

**वसंतरावः**–( माधवरावाजवळ जाऊन ) कसं काय वाटतं आहे आतां, माधव ?

**माधवरावः**–( हळूच ) अगदीं सुखास वाटत आहे. माझी बिलकूल काळजी करूं नको ( उठत ) गणपतराव, आज आपण एका मातेला पुत्रदान केलेंत.

**गणपतरावः**–( शेंफारून ) खरी गोष्ट आहे.

**माधवरावः**–भगिनीला बंधुदान केलेंत.

**गणपतरावः**–आणि तुम्हांला जीवदान दिलें.

**माधवरावः**–आपल्या उपकारांचे आभार मानायला भाषेंत मला शब्दांचीच कमतरता भासत आहे.

**गणपतरावः**–( मान डोलवीत ) अत्यंत खरी गोष्ट आहे. माधवराव, माझ्याशिवाय आज तुम्हीं पशुपक्ष्यांप्रमाणें दीनवाणे रस्त्यावर मरून पडलां असतां. मीं तुमचा जीव बचावला, तुमच्यामुळें मला कृतकृत्य वाटत आहे. हा सोन्याचा दिवस मी कधींही विसरणार नाहीं.

**माधवरावः**–माझ्याही तो निरंतर स्मरणांत राहील.

**गणपतरावः**–( वसंतरावाकडे पाहून ) वसंतराव, जिवावर ओढलेल्या संकटांतून एका मानवबंधूला ओढून काढण्यांत काय सुख व समाधान वाटलें तें तुम्हांला सांगून कसें समजणार ?

**विद्या**:--बाबा, वसंतरावांना तें सांगायची काय जरूर? त्यांना तर त्याचा प्रत्यक्ष अनुभव आहे. आजच नाहीं का त्यांनीं तुम्हांला--

**गणपतराव**:--अरे हो. (हॉटेल मॅनेजरास) तुमचं पुस्तक जरा द्या बरं.

**हॉटेल मॅनेजर**:--कशाला तें?

**गणपतराव**:--आतां घडून आलेल्या हकीकतीचें टिपण त्यांत करून ठेवतों. (पुस्तक घेऊन उघडतो) अरे, पण हें कुणी लिहिलं आहे?

**सर्व**:--काय कुणी लिहिलं आहे?

**गणपतराव**:--(वाचीत) श्रीशिवाजीमहाराजांनीं प्रतापगडाच्या पायथ्याशीं--गडावर नव्हे--शाहिस्तेखानाचा नसून अफझुलखानाचा वध केला. रा. रा. गणपतराव शहाणे यांनीं इतिहासाचा अभ्यास केला तर त्यांत त्यांचा कांहीं तोटा होणार नाहीं. समशेरबहादुर संभाजीराव भोंसले.

**सर्व**:--आं!

**विद्या**:--(हळूच, गणपतरावांस) बाबा, खरंच, प्रतापगडच्या पायथ्याशीं अफझुलखानाचा वध झाला. शाहिस्तेखानाचीं पुण्यास कायतीं तीन बोटंच कापलीं होतीं.

**गणपतराव**:--थांब म्हणावं, इतिहासाच्या--(टांक घेऊन लिहूं लागतो) "नसते उपद्व्याप व फाजील लुडबूड चार आण्याच्या वस्तऱ्याचे हजामबहादूर करीत असतात. खऱ्याखुऱ्या समशेरबहादुरांना असले कारभार करायला फुरसत नसते. गणपतराव शहाणे." मला अक्कल शिकवतोस काय, बेट्या?

**हॉटेल मॅनेजर**:--उद्यांच्या सिनेमाचीं किती तिकिटें आपल्याला पाहिजे होतीं?

**गणपतराव**:--तीन मागवलीं होतीं, पण चार पाठवा आणायला. कायहो, माधवराव, उद्यां मॉरिस शेव्हालिअरची नवी फिल्म लावणार आहेत. ती पहायला यालना आमच्या बरोबर?

**माधवराव**:–मोठ्या खुषीनें येईन.

**गणपतराव**:–( हॉटेल मॅनेजरास ) मग चार बाक्सचीं तिकिटें.

**सरस्वती**:–( हळूच ) चार तिकिटें कशीं पुरतील ? वसंतरावांना धरून आपण पांचजण होतों.

**गणपतराव**:–अग शहाणे, चारच तर माणसांना गाडींत जागा आहे.

**सरस्वती**:–म्हणून काय झालं, टांगा करावा आणखी पाहिजे तर. वसंतरावांना वगळतां कसं येईल ? शिवाय आजच त्यांनीं माझ्याजवळ विद्येला लग्नाची मागणी घातली आहे.

**गणपतराव**:–एवढंच ना ? माझ्याजवळ त्याहून उत्तम स्थळ सांगून आलें आहे. खुद्द माधवरावांनीं माझे जामात होण्याची इच्छा दर्शविली आहे. तेव्हां वसंतरावांना उगीच फुकट कशाला सिनेमाला न्यायचं !

**सरस्वती**:–वाहवा ! चांगलेच उपकार फेडतां म्हणायचे. मींच मागवतें पांच तिकिटें. ( मोठ्यानें हॉटेल मॅनेजरास ) उद्यांच्या सिनेमाचीं चार नाहीं, पांच तिकिटें काढावयास सांगा. वसंतराव, आपणही यालना आमचे बरोबर ?

**वसंतराव**:–मोठ्या आनंदानें आलों असतों, परंतु उद्यां मला सवड होणार नाहीं. ( स्वगत ) जुलमाचा रामराम उगीच कशाला घेत बसूं ?

**माधवराव**:–( स्वगत ) बिचारा वसंत.

( पडदा )



# अंक तिसरा

## प्रवेश पहिला

( औरंगाबादेस गणपतरावांचा दिवाणखाना )

**गणपतराव:**—परवां ह्या वेळेस आपण महाबळेश्वरास होतों. पंधरा दिवस कसे हां हां म्हणतां निघून गेले, जसें कांहीं एक सुंदर स्वप्नच पडलें होतें.

**सरस्वती:**—स्वप्न असलं आणि कांहीं असलं तरी एक गोष्ट खरी आहे कीं विद्येला दोन वर सांगून आले आहेत. त्यांतील एक नक्की करायच्या विचाराला लागलं पाहिजे. किती वेळ दोघांना तिष्ठत बसवायचं? आजच सकाळीं माझा भाऊ वसंतरावांच्या कुलशीलाची सर्व चौकशी करून आला आहे. त्यांच्यांत नांव ठेवायला तिळाएवढीसुद्धां जागा नाहीं. वडिलोपार्जित इष्टेट, एकुलता एक मुलगा, सरकारी नोकरी—

**गणपतराव:**—परंतु मी विद्येचा हात माधवरावांच्या हातीं देणार.

**सरस्वती:**—तो कां म्हणून ! त्यांच्यांत काय जास्ती आहे ?

**गणपतराव:**—त्यांच्यांत, त्यांच्यांत—ते एका बँकेचे डिरेक्टर आहेत.

**सरस्वती:**— मग तर मुळींच नाहीं मी त्यांना देऊं देणार विद्येला. तरी बरं, परवांच एक बँक बुडाली म्हणून सांगितलंत. बँकेचें दिवाळं निघाल्यावर काय डिरेक्टरबरोबर भीक मागायची आहे ? तें कांहीं नाहीं, सरकारी नोकरीच चांगली भरंवशाची, ती सोडून—

**गणपतराव:**—ती सोडून मी माधवरावांसच जांवई करणार.

**सरस्वती:**—रांडेच्यानों, त्यांच्यांत हो काय एवढी जादू भरली आहे ?

**गणपतराव**:–भरली आहे खरी जादूच. ती शब्दांनीं कांहीं वर्णन करतां येणार नाहीं. माधवरावांसारखा मोहक मनुष्य सगळी पृथ्वी धुंडाळली तरी सांपडणार नाहीं. त्यांना सोडून म्हणे वसंतराव––

**सरस्वती**:–वसंतरावांत हो काय कमी आहे? एकतर त्यांनीं तुमचा जीव बचावला आहे.

**गणपतराव**:–( चिडून, वेडावीत ) जीव बचावला आहे, जीव बचावला आहे, उठल्याबसल्या तीच किटकीट. जीव बचावला, जीवदान दिलं, जिवावरचं संकट दूर केलं, दुसरं कांहीं बोलणं नाहीं.

**सरस्वती**:–काय बाई तरी मासला आहे स्वभावाचा! ज्याचं करायला जावं बरं, तें म्हणतं माझंच खरं.

**गणपतराव**:–घमेंडखोर पहिल्या नंबरचे.

**सरस्वती**:–कोण घमेंडखोर ?

**गणपतराव**:–तुझे वसंतराव. दुसरं कोण ?

**सरस्वती**:–वसंतराव घमेंडखोर ?

**गणपतराव**:–होय. नेहमीं तुच्छतेनें बोलत असतात. "कसा मीं तुमचा जीव वांचवला, कसा मीं तुमचा जीव वांचवला" असं नेहमीं त्यांच्या चेहऱ्यावर लिहिलेलं दिसतं.

**सरस्वती**:–त्या गोष्टीचा कधीं उल्लेखही करीत नाहींत बिचारे.

**गणपतराव**:–स्पष्टपणें नाहींच कधीं उल्लेख करीत. परंतु "काय बच्चमजी कशी होत होती खात्री" "मीं नसतों तर कुठें पडलां असतात चेंदामेंदा होऊन" असं त्यांच्या हावभावांत सारखं भासून येतं.

**सरस्वती**:–( स्वगत ) चोराच्या मनांत चांदणं!

**गणपतराव**:–कुठें तुझे अरेरावी वसंतराव आणि कुठें मोकळ्या मनाचे माधवराव!

**सरस्वती:**–वाहवा! स्वभावाची पारख फारच उत्तम केलीत. विनयशील, शिस्त स्वभावाचे वसंतराव म्हणे अरेरावी, आणि महामतलबी माधवराव म्हणे मोकळ्या मनाचे! "तुमच्याशिवाय आज माझे बाराच वाजत होते. तुम्हीं आज मला जीवदान दिलंत. माझ्या मातोश्रींना पुत्रदान केलंत..." असा सारखा तुमचा जयघोष करून माधवराव चढवतात तुम्हांला हरभऱ्याच्या झाडावर, आणि तुम्ही चढतां. त्यांनीं मात्र तुमचा स्तुतिप्रिय स्वभाव चांगला ओळखून ठेवला आहे.

**गणपतराव:**–स्तुतिप्रिय असलों तरी स्तुतिपात्र आहें हें आधीं कबूल कर. स्वतःच्या जिवाची पर्वा न करतां दुसऱ्याचा जीव बचावणारा शूर वीर जरूर स्तुतिपात्र आहे. त्याचा गौरव—

**सरस्वती:**–पुरे झाला तुमचा आत्मगौरव. विद्येला तुमच्याशीं तर नाहींना लग्न करायचं?

**गणपतराव:**–विद्या केव्हांही माधवरावांसच पसंत करील.

**सरस्वती:**–कशावरून?

**गणपतराव:**–मी सांगतों म्हणून.

**सरस्वती:**–मग पाहूंच तिला विचारून. आणि तिच्या जो मनास येईल तोच वर ठरवूं म्हणजे झालं.

**गणपतराव:**–कबूल. पण तिला स्वतंत्रपणें निवड करूं दिली पाहिजे. प्रथम तिचें मन कलुषित करतां कामा नये.

**सरस्वती:**–ही पहा आलीच ती. ( विद्या येते ) विद्याताई, इकडे ये. तूं आतां मोठी व समंजस मुलगी झाली आहेस. आज आम्हां उभयतांना तुझ्याशीं थोडं बोलायचं आहे.

**विद्या:**–( आश्चर्यानें ) माझ्याशीं?

**गणपतराव:**–होय.

**सरस्वती:**–तुझं आतां लग्नाचं वय झालं आहे. तुला दोन मागण्याही आल्या आहेत. दोन्ही स्थळें अनुरूप आहेत. तुझ्या मनाविरुद्ध तुझ्या-

वर कोणतेंच स्थळ लादण्याची आमची इच्छा नाहीं. तव्हां तुला जें मनास येईल तें तूं पसंत कर.

**विद्या:**—मीं पसंत करूं ?

**गणपतराव:**—हो तूंच. तुला जें आवडेल तें.

**सरस्वती:**—पहिलं स्थळ वसंतराव दाणी यांचं.

**विद्या:**—खरंच ?

**गणपतराव:**—( सरस्वतीस ) जास्त कांहीं बोलूं नकोस.

**सरस्वती:**—दुसरं स्थळ माधवराव साठे यांचं.

**गणपतराव:**—गृहस्थ किती दिलदार, भारदस्त आणि विनोदी आहे. मीं चोरून कशाला ठेवूं ? मला माधवराव मनापासून पसंत आहेत. असा गृहस्थ सारी पृथ्वी धुंडाळून——

**सरस्वती:**—तुम्हींच चालवली आहे आतां त्यांची वकिली.

**गणपतराव:**—बिलकुल नाहीं. मीं खरं आहे तें तिला सांगतों. आतां विद्या तुझ्या कोण पसंतीस आहे तें सांग.

**विद्या:**—इश्श, मीं काय बाई सांगूं ? तुमच्या दोघांच्या मनांतून मला जिथें द्यायची असेल तिथें द्यावी.

**गणपतराव:**—छे छे, तुला स्वतःलाच निवड केली पाहिजे.

**सरस्वती:**—सांग, विद्या, संकोच करूं नको.

**विद्या:**—बरं तर मग. मला पहिलं स्थळ पसंत आहे.

**गणपतराव:**—कोण वसंतराव ? ( विद्या मान डोलविते ) आणि माधवराव कां नाहींत ? वसंतरावांत काय जास्ती आहे ?

**विद्या:**—बाबा, त्यांनीं तुमच्या जिवावरचं संकट दूर नाहीं का केलं ?

**गणपतराव:**—शिंच्यानों, फिरून तोच मंत्र.

**सरस्वती:**—ऐकलंत ना विद्येचं उत्तर ? आतां सांगा जाऊन वसंतरावांना.

**गणपतराव**:-तरतर! त्या गाढवीला नाहीं अक्कल, आणि तूं तिचीच आई.

**सरस्वती**:-दिलेलं वचन मोडणं हें कांहीं मोठेपणाचं लक्षण नाहीं.

**गणपतराव**:-पुरे पुरे आपलीं मुक्ताफळें.

**वसंतराव**:-( प्रवेश करीत ) येऊं का आंत?

**विद्या**:-अगबाई!

**सरस्वती**:-( उठून ) जरूर जरूर. आपलीच वाट पहात होतों आम्ही.

**वसंतराव**:-कसं काय? आपला प्रवास सुखरूपपणें पार पडला?

**गणपतराव**:-( स्वगत ) जसें कांहीं हे दुढ्ढाचार्य हजर असल्या-खेरीज प्रवास सुखरूपपणें पार पडणें अशक्यच आहे.

**माधवराव**:-( प्रवेश करीत ) येऊं का आंत?

**गणपतराव**:-अगदीं बेशक. सद्रू, अरे एक आराम खुर्ची घेऊन ये बरं.

**माधवराव**:-काय प्रवास वगैरे ठीकपणें झाला?

**गणपतराव**:-हो हो. तुम्हीं बरोबर असतां तर अधिक मजा झाली असती.

**विद्या**:-( वर्तमानपत्र उघडून ) अगबाई, बाबांच्या विषयीं काय लिहिलं आहे वर्तमानपत्रांत.

**गणपतराव**:-काय म्हणतेस? माझ्याविषयीं? पाहूं आण इकडे. ( विद्या गणपतरावांना वर्तमानपत्र देते. सर्व मंडळी गणपतरावांच्या भोंवतीं जमतात )

**सर्व**:-वाहवा!

आहे बुवा!

शाबास!

अरे वा!

**गणपतराव**:–( वाचीत ) " परगांवची बातमी. प्रशंसनीय धैर्यानें व अवर्णनीय प्रसंगावधानानें टळलेला एक अपघात. औरंगाबादेंतील प्रसिद्ध सावकार व हिंदुसमाजाचे प्रख्यात पुढारी गणपतराव शहाणे यांनीं आपल्या जिवाकडे न पहातां महाबळेश्वरीं एका वाटसरूस अजगराच्या विळख्यांतून सोडविलें, आणि विलक्षण प्रसंगावधान राखून दंश केलेल्या जागचं वीष चोखून टाकून त्या दैववान माणसास फिरून जीवदान दिलें. ह्या प्रशंसनीय कृत्याबद्दल आम्हीं त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करितों."

**सर्व**:–वाहवा !

**माधवराव**:–( स्वगत ) शब्दाला दोन पैसे आणि मथळयाला आठ आणे. एकंदर एक रुपया तेरा आण्यांची खोट लागली खिशाला.

**गणपतराव**:–( फिरून वाचीत ) " प्रशंसनीय धैर्यानें व अवर्णनीय प्रसंगावधानें टाळलेला अपघात "— माधवराव तुम्हांला कुठे ठेवूं आणि कुठें नाहीं असें झालें आहे ( माधवरावांना मिठी मारतो )

**माधवराव**:–( स्वगत ) नशीब जोरावर आहे अन् काय ?

**गणपतराव**:–( खिशांतून पैसे काढीत ) अरे सदू, या वर्तमानपत्राच्या दहा प्रती विकत घेऊन ये बरं. ( सदू येतो, जातो ).

**सरस्वती**:–एकलं का ? तुमच्यावर ओढलेल्या संकटाचें वसंतरावांनीं कसें धैर्यानें निवारण केलें याविषयीं जर दोन ओळी या वर्तमानपत्राकडे छापायला पाठवल्या तर ?

**विद्या**:–हो, गडे, बाबा. मीं देऊं का लिहून ?

**गणपतराव**:–छे, कांहीं जरूर नाहीं. सारा वेळ माझें नांव वर्तमानपत्रांत फडकवण्याइतका घमेंडखोर मीं नाहीं.

**सदू**:–( प्रवेश करून ) एक सरकारी शिपाई आतांच हा लिफाफा देऊन गेला.

**सरस्वती**:–सरकारी शिपाइ ?

**गणपतराव:**–त्यांत घाबरायला काय झालं ? ( वाचीत ) अरे देवा ! इतक्या क्षुल्लक गोष्टीकरतां या वयांत मला कोर्टाची पायरी चढावी लागणार.

**सरस्वती:**–ती कशाकरतां ? काय लिहिलं आहे त्यांत ? सांगा तरी नीटपणें.

**गणपतराव:**–( मोठ्यानें वाचीत ) ता. २ जून रोजीं कायद्याचें जाणून बुजून उल्लंघन केल्याबद्दल व हुकमाची अंमलबजावणी करीत असतांना सरकारी अधिकाऱ्याचा अपमान केल्याबद्दल रा. रा. गणपतराव शहाणे यांना जून ५ रोजीं दुपारीं ३ वाजतां कोर्टांत हजर रहाण्याचा सरकारनीं हुकूम केला आहे.

**सरस्वती:**–कसला कायदा नी कुठचा अधिकारी ? हें गौडबंगाल आहे तरी काय ? मेले दोन दिवस नाहीं झाले परत येऊन तर कुठें गेलां होतां कायदे मोडायला ?

**गणपतराव:**–ही आपलीच हौस फिटते आहे, राणी सरकार. वाज्याच्या घड्याळाचे डोहाळे लागले होते ना आपणाला ?

**सरस्वती:**–बरं मग ?

**गणपतराव:**–त्या घड्याळावरची दहा रुपये जकात वांचवण्यासाठीं तें फराळाच्या टोपलींत घालून वरतीं हापूसचे आंबे नीट रचून टोपलीचें झांकण लावून मीं ती घरीं घेऊन येत होतों. नावयावर विचारलं एका दाढीवाल्यानें कीं संस्थानाबाहेर कांहीं सामान विकत घेतलें आहे कीं काय ? मीं चक्क नाहीं म्हणून सांगितलं. इतक्यांत त्या तुझ्या शिंच्या घड्याळाचा बाजा वाजूं लागला. लागलीच टोपली उपडी करून घड्याळ जप्त करून माझ्यावर गुरगुरून तो दाढीमिशाळ लागला आणखी जकातीचे दहा रुपये मागायला. मग काय मींही दिली हांसडून एक शालजोडींतली पदवी. ठेवले आहेत त्याच्या बापानें दहा रुपये !

**सरस्वतीः**—वाहवा ! फारच शौर्य दाखवलंत.

**माधवरावः**—छे छे गणपतराव, दहा काय आतां शंभर रुपयांनीं सुद्धां हें प्रकरण मिटेल कीं नाहीं याची शंका आहे. जकात चुकवूं पहाणाऱ्यांना हल्लीं जरा कडक रीतीनें वागवतात.

**गणपतरावः**—अरे बापरे. मग काय शिक्षा होणार मला आतां ?

**माधवरावः**—दोन आठवड्यांपासून एक महिन्यापर्यंत कारागृहवास, आणि चुकवलेल्या जकातीच्या दसपट दंड.

**गणपतरावः**— आई जगदंबे ! कारागृहवास ! मीं कधीं कोणाची चोरी, चहाडी, शिंदळकी केली नाहीं आणि या वयांत मला तुरुंगाची पायरी ! ( रडकुंडीस येतो. )

**वसंतरावः**—मला जरा विचार करूं द्या. कदाचित् या पेंचांतून मला आपल्याला सोडवतां येईल.

**सरस्वतीः**—देव तुम्हांला सोन्यानें मढवून काढील.

**गणपतरावः**—आणि मीं तुमच्या पायांवर लोटांगणें घालीन.

**विद्याः**—( स्वगत ) माझी होतीच खात्री कीं वसंतराव कांहीं तरी तोड काढतील म्हणून.

**वसंतरावः**—जरा तो कागद द्या बरं. मी आतांच जातों नाक्यावर.

**गणपतरावः**—हा घ्या वसंतराव, आणि संध्याकाळीं येथेंच जेवायास रहा.

**वसंतरावः**—( जातां जातां माधवरावांस ) आतां कुणाची होते आहे सरशी ?

**माधवरावः**—( स्वगत ) चायला, वसंत गुलामाचा तर जकातखात्यांतलाच शिष्ट आहे. मला वाटत होतं कीं आली विद्या आपल्या हातीं म्हणून, इतक्यांत सगळंच मनोराज्य ढांसळून पडणार असं चिन्ह दिसत आहे. ( डोकें खाजवतो. )

**सरस्वती**:–( हळूच ) आतां वसंतरावांविषयीं काय मत आहे आपलं ?

**गणपतराव**:–लाखांत माणूस आहे. अति हुषार, वजनदार आणि परोपकारी.

**सरस्वती**:–मग त्यांची मागणी मान्य करायची ना ?

**गणपतराव**:–तावडतोब.

**सरस्वती**:–आलांत अखेरीस ताळ्यावर. मग द्या आतां माधवरावांनीं निरोप.

**गणपतराव**:–बिचारे माधवराव. त्यांना सांगूंच म्हणतेस ?

**सरस्वती**:–नाहीतर काय निमंत्रणपत्रिका पाठवीपर्यंत त्यांना ताट-कळत ठेवायचे कीं काय ?

**गणपतराव**:–छे छे.

**सरस्वती**:–मीं जातें आतां. होऊंदे आपला दोघांचा संवाद. टाका एकदां सांगून मन घट्ट करून. ( माधवरावास दुरून नमस्कार करून जाते. )

**माधवराव**:–( स्वगत ) आमची किंमत उतरत चालली हें तर उघड आहे. ( खुर्चीवर बसतो ).

**गणपतराव**:–( स्वगत ) सांगायचं माझ्या जिवावर येत आहे. किती मर्जी बसली होती माझी त्यांच्यावर ! ( उसासा टाकून ) चला टाकूं एकदां आटपून. लांबणीवर टाकून किती निभावणार ? ( मोठ्यानें ) माधवराव, तुम्हांला एक कडू बातमी सांगायचं माझ्या नशिबीं आलं आहे.

**माधवराव**:–( स्वगत ) चला ठेपलीच वेळ येऊन.

**गणपतराव**:–माझ्या कन्येला मागणी घालून तुम्हीं माझा मोठा गौरव केला होतात. तुमच्याशीं इतका निकट संबंध करून घेण्याचे मीं आज-पर्यंत मनांत वाडे बांधीत होतों. परंतु अनेक कारणांमुळें व घडून

आलेल्या वेगवेगळ्या गोष्टींमुळें—थोडक्यांत सांगायचें म्हणजे वसंतरावांनीं मला आजन्म ऋणी करून ठेवलें आहे.

**माधवराव**:—आलं माझ्या ध्यानांत.

**गणपतराव**:—कारण, कांहीं म्हटलं तरी त्यांनीं माझा जीव बचावला आहे.

**माधवराव**:—खरं कीं काय ? मग त्या हातीं लागलेल्या झाडाचं काय झालं ?

**गणपतराव**:—अहो, झाड कसलं तें, झुडुपच होतं. शिवाय तेंही कांहीं पूर्णपणें माझ्या हातीं लागलं नव्हतं.

**माधवराव**:—अस्सं अस्सं. मग गोष्टच वेगळी.

**गणपतराव**:—कांहीं असलं तरी मला बचावण्याकरितां वसंतरावांनीं आपला स्वतःचा जीव धोक्यांत घातला हें तर सर्वमान्य आहे कीं नाहीं ?

**माधवराव**:—गणपतराव, ज्या भावनेमुळें आपण माझी मागणी नाकारीत आहां ती भावना इतकी उदात्त आहे कीं मीं हूं किंवा चूं न करतां आपला नकार मान्य करतों.

**गणपतराव**:—माझ्यावर यत्किंचित्‌ही रोष न करतां ?

**माधवराव**:—आपल्यावर रोष ? आपल्या अनुपम शौर्यानें व अमर्याद उपकारांनीं लाचार होऊन गेलेला पामर आपल्यावर रोष कसा करील ?

**गणपतराव**:—( त्याच्या पाठीवर हात ठेवून ) अहाहा माधवराव ! ( स्वगत ) माझा यांच्यावर अधिकाधिक लोभ बसत आहे.

**माधवराव**:—( उठून ) आपला अखेरचा निरोप घेण्याच्या आधीं—

**गणपतराव**:—काय म्हणतांत ?

**माधवराव**:—आपला अखेरचा निरोप...

**गणपतराव**:—अखेरचा निरोप ? तो काय म्हणून ?

**माधवराव**:–यापुढें आपल्याकडे वारंवार येण्यानें कुटाळ लोकांना टीका करायला अवसर मिळेल, आणि शिवाय यानंतर मलाही आपल्या कन्येचें दर्शन दुःखकारक होणार, तव्हां—

**गणपतराव**:–आलं ध्यानांत. सर्व आयुष्यांत ज्या एकाच माणसाचा जीव मीं बचावला त्याच्याच भेटीला मुकायचं नशिबीं आलं.

**माधवराव**:–आपली मूर्ति माझ्या डोळ्यांसमोरून कधींही ढळणार नाहीं. तिला चित्ररूपानें कायमची उमटून ठेवायचें माझ्या फार मनांत आहे. त्या चित्राचं नांव—

**गणपतराव**:–चित्र ? माझं चित्र काढणार म्हणतां ? खरोखरीच आपल्याला चित्रकलेचं ज्ञान—

**माधवराव**:–मला नाहीं. मीं आपली परवानगी न विचारतां एका जगत्प्रसिद्ध चित्रकाराला विचारायचं धाडसही करून चुकलों.

**गणपतराव**:–जगत्प्रसिद्ध ? संस्थानाच्या बाहेरही त्या चित्राची प्रसिद्धी होईल म्हणतां ?

**माधवराव**:–कां नाहीं होणार ? परंतु आपली प्रतिमा हुबेहूब आली पाहिजे.

**गणपतराव**:–हो अवश्य. नाहीं तर चित्र काढण्यांत काय अर्थ !

**माधवराव**:–म्हणून सांगतों कीं पांच सहा वेळां तास दीड तास अगदीं स्तब्ध बसण्याची तसदी आपल्याला घ्यावी लागेल.

**गणपतराव**:–हात्तिच्या ! पांच सहा तास काय ? दहा बारा तास सुद्धां बसेन मीं.

**माधवराव**:–पूर्ण झाल्यावर तें चित्र आपण प्रदर्शनांत पाठवूं.

**गणपतराव**:–कोणत्या ? हैद्राबादच्या ?

**माधवराव**:–नाहीं, मुंबईच्या.

**गणपतराव**:—खरं कीं काय ? पण नांव काय देणार त्या चित्राला ? आज वर्तमानपत्रांत होतं तेंच द्यावें. प्रशंसनीय धैर्यानें व अवर्णनीय प्रसंगावधानानें टाळलेला अपघात.

**माधवराव**:—हा मथळा जरा अरसिक होतो. शिवाय चित्र अपघाताचें नसून आपलें काढायचें आहे. कालियामर्दन करणारा आधुनिक कृष्ण, हें नांव आपणांस कसं वाटतं ?

**गणपतराव**:—वाहवा ! कालियामर्दन करणारा आधुनिक कृष्ण ! अहाहा ( फिरून फिरून तेंच म्हणत ) कालियामर्दन करणारा आधुनिक कृष्ण, तो मी. अहाहा, माधवराव, किती योग्य नांव दिलंत पण चित्राला.

**माधवराव**:—येतों आतां, गणपतराव, शेवटच्या भेटीच्या वेळीं माझें अंतःकरण—

**गणपतराव**:—अशक्य, अशक्य. मीं बिलकुल कबूल करणार नाहीं. तुमच्या सारख्या जिवलग मित्राला मीं कधींही अखेरचा निरोप देणार नाहीं. अहो लग्नाचं अजून कुठें काय नक्की झालं आहे ?

**माधवराव**:—तरी पण—

**गणपतराव**:—( हात धरून ) मीं तुम्हांला जाऊंच देत नाहीं.

**माधवराव**:—परंतु वसंतरावांच्या उपकाराबद्दल—

**गणपतराव**:—देईन त्याना एक सोन्याची आंगठी.

**माधवराव**:—( स्वगत ) अरेच्या, अजून धुगधुगी आहे म्हणायची.

**संभाजीराव**:—( प्रवेश करून ) आपली ओळख नसतां आपल्याकडे आल्याबद्दल माफी असावी.

**गणपतराव**:—( स्वगत ) हें कोण प्रस्थ आहे बुवा ! ( मोठ्यानें ) माफीचा कांहीं एक प्रश्न नाहीं.

**संभाजीराव**:—( माधवरावास ) गणपतराव शहाणे ते आपणच काय ?

**गणपतराव**:-नाहीं, माझं नांव गणपतराव शहाणे आहे.

**संभाजीराव**:-उत्तम. आज दहा दिवस झाले, मीं आपल्या शोधांत आहें. औरंगाबादेस शहाणे बरेच आहेत. आपल्या शोधार्थ मीं पंधरा सोळा शहाण्यांचे उंबरठे ओलांडले आहेत.

**माधवराव**:-( स्वगत ) बराच चिकट दिसतो आहे प्राणी.

**गणपतराव**:-आपलं माझ्याकडे काय काम आहे हें समजलं तर—

**संभाजीराव**:-सांगतों सवडीनुसार. परंतु प्रथम कृपा करून सांगा, कीं सुमारें एक महिन्यापूर्वीं आपण महाबळेश्वरीं सुखनिवास हाटेलांत उतरलां होतां काय ?

**गणपतराव**:-होय. मोठ्या अभिमानपूर्वक आपल्याला सांगतों कीं मींच तो गणपतराव शहाणे.

**संभाजीराव**:-ठीक आहे. तर मग आपणच तेथील उतारूंच्या शेरेबुकांत लिहिलं आहेना कीं " नसते उपद्व्याप व फाजील लुडबूड, चार आण्याच्या वस्तऱ्याचे हजामबहादूर करीत असतात. खऱ्याखुऱ्या समशेरबहादुरास असले कारभार करावयास वेळ नसतो "

**गणपतराव**:-अरे तिच्या, संभाजीराव भोंसले ते आपणच कीं काय?

**संभाजीराव**:-होय महाराज, मीच.

**गणपतराव**:-( विरघळत ) आपल्या भेटीनें मला फार आनंद होत आहे.

**संभाजीराव**:-मी नसता वितंडवादी मनुष्य नाहीं. परंतु हाटेलच्या शेरेबुकांत अशी निवडक पदवी दिलेली मला खपत नाहीं.

**गणपतराव**:-पहिली कुरापत आपणच काढलीत.

**संभाजीराव**:-श्रीशिवाजीमहाराजांनीं प्रतापगडच्या पायथ्याशीं शाहिस्तेखानाचा नसून अफझुलखानाचा वध केला एवढेंच मीं प्रतिपादन केलें होतें. आपल्यास खोटें वाटत असेल तर पाहिजे तो मराठ्यांचा इतिहास उघडून पहा.

**गणपतराव**:—माझ्या इतिहासभूगोलांतील चुका—नजरचुकाच म्हणायच्या—दुरुस्त करण्याचा मक्ता आपणांस कुणी दिला होता? दुसऱ्याच्या कारभारांत तोंड घालायचं आपणांस काय प्रयोजन होतें?

**संभाजीराव**:—जरा ऐकून तर घ्या. मराठ्यांचा इतिहास मला परमपूज्य आहे. माझें नांव श्रीशिवाजीमहाराजांप्रमाणें भोंसलेच आहे. तेव्हां त्यांच्या पराक्रमांविषयीं जर कोणी चुकीचें विधान केलें तर मीं स्वतः अस्सल मराठ्याप्रमाणें योग्य तो बंदोबस्त लावतों.

**गणपतराव**:—म्हणजे थोडक्यांत मला मराठ्यांच्या इतिहासाचा पहिला धडा देण्याकरितांच येथें येण्याचे श्रम आपण घेतलेत म्हणायचे.

**संभाजीराव**:—इतका उद्दाम विचारही कधीं माझ्या मनाला शिवला नव्हता.

**गणपतराव**:—मोठी खैरच केलीत म्हणायची (स्वगत) लागली स्वारी माघार घ्यायला.

**संभाजीराव**:—इतिहासाचा धडा देणें बाजूला ठेऊन मीं गोडीगुलाबीनें आपल्याकडून एका गोष्टीचें स्पष्टीकरण करून घेण्यास आलों आहें.

**गणपतराव**:—(स्वगत) बराच मऊ येऊं लागला प्राणी. मला वाटल्याप्रमाणें खोटीच समशेरबहादुरी दिसत आहे.

**संभाजीराव**:—एकतर शेरेबुकांत लिहिलेलं आपलं म्हणणं आपण धरून बसणार—

**गणपतराव**:—इतक्या वाटाघाटीची कांहीं जरूरी नाहीं. मीं आपल्याला घाबरून गेलों आहें असं कदाचित् आपल्याला वाटत असेल. मीं विलक्षण धैर्यवान मनुष्य आहें. माझ्या धाडसाची परीक्षा खुद्द महाबळेश्वरींच झाली आहे, त्याचा दाखला मीं आपणांस लवकरच दाखवीन.

**संभाजीराव**:—तो कसा, कुठें आणि केव्हां?

**गणपतराव**:—चित्ररूपानें, प्रदर्शनांत आणि पुढल्या वर्षी. (माधवराव तोंड फिरवन हंसतात)

**संभाजीरावः**–चित्ररूपी शौर्य सिनेमांत पाहिलें आहे, परंतु प्रदर्शनांत पहाण्याचें आजच ऐकतों. तथापि पुढच्या वर्षापर्यंत थांबण्यास मला अवसर नाहीं. तेव्हां पाल्हाळ न लावतां थोडक्यांत विचारतों कीं मला उद्देशून लिहिलेले शब्द आपण परत घेतां कीं नाहीं ?

**गणपतरावः**–सोडलेला बाण, दिलेलें वचन व लिहिलेला शब्द मी कधींही परत घेत नसतों.

**संभाजीरावः**–पहा बरं.

**माधवरावः**–गणपतराव, अविचारानें उगीच—

**गणपतरावः**–ठीक विचार करूनच बोलतों आहें ( स्वगत ) मिशा-सुद्धां नाहींत आणि म्हणे समशेरबहादुर.

**संभाजीरावः**–उत्तम आहे. हजामबहादूर कीं समशेरबहादूर याचा सोक्षमोक्ष उद्यां संध्याकाळीं पांच वाजतां निजाम बागेंत आपण दोघे लावूं. आपण आपली तलवार बरोबर घेऊन या मी माझी आणीन.

**माधवरावः**–समशेरबहादूरसाहेब, जरा थांबा, माझे दोन शब्द तरी ऐकून घ्या.

**संभाजीरावः**–उद्यां संध्याकाळीं पांच वाजतां ऐकेन. मला आतां बिलकूल फुरसत नाहीं ( जातो. )

**माधवरावः**–बऱ्याच त्वेषांत बोललांत हो ! समशेरबहादुरांशीं जरा नमूनच–

**गणपतरावः**–अहो कुठचा आला आहे समशेरबहादूर ? खऱ्याखुऱ्या समशेरबहादुराला इतिहासभूगोलाची विचक्षणा करायला वेळच नसतो.

**माधवरावः**–तरी पण कुणाशीं गांठ आहे याची प्रथम खात्री करून घेतल्याखेरीज—

**गणपतरावः**–सदू ! ( सदू येतो ) या गृहस्थाला आंत कां येऊं दिलंस ?

**सदू**:–सरकार, आज सकाळीं ते एकदां येऊन गेले होते. त्यांनीं एका कागदाच्या तुकड्यावर आपलं नांवही लिहिलं होतं. ( कागद पुढें करतो )

**गणपतराव**:–दे पाहूं इकडे तो कागद ( वाचीत ) " समशेरबहादूर संभाजीराव भोंसले, बाराव्या पलटणीचे मुख्य अधिकारी " अरे रामा !

**माधवराव**:–चांगल्याच पेंचांत सांपडलां म्हणायचे.

**गणपतराव**:–आतां काय करणार ? बोललों खरा थोडा गुर्मीनें. मनुष्य किती सज्जन होता. मला वाटलं, असेल कुणी शेंदाडशिपाई.

**माधवराव**:–आतां पुढें काय ?

**गणपतराव**:–कांहीं तरी मार्ग हुडकून काढायला पाहिजे. ( विचार करतां एकदम डोक्यांत प्रकाश पडतो ) अरे हो रे हो.

**माधवराव**:–काय सुचला कांहीं उपाय ?

**गणपतराव**:–(लपवाछपव करीत ) कांहीं नाहीं. यांतून मुळीं कांहीं तरणोपाय नाहींच.

**माधवराव**:–मग आपण खरोखरीच समशेरबहादुरांचें आव्हान स्वीकारणार कीं काय ?

**गणपराव**:–माधवराव, ऐन संकटाच्यावेळीं माघार घेणारा नामर्द हा गणपतराव शहाणे नव्हे. ( ऐटींत जातो ).

**माधवराव**:–काय करावं आतां ? अगदीं निकरावर गोष्ट येऊन ठेपली. संभाजीरावांपुढें आमच्या श्वशुरांचा काय टिकाव लागणार ! आणि समशेरबहादुर तर बिलकुल गय करणार नाहींत. अर्ध्या मिनिटांत चटणी उडवतील. सगळा उपद्व्याप इतिहासांतील एका सामान्य चुकीसाठीं. हें प्रकरण थांबवलं पाहिजेच. काय युक्ति योजावी बरं ? पोलिसांत वर्दी दिली तर ? कायद्याची तर द्वंद्वयुद्धाला मनाई आहे. हो. निनांवी पत्र लिहिलं तर कुणाला काय समजणार. ( टेबलाजवळ जाऊन

हातांत टांक घेऊन लिहीत लिहीत ) हं पोलीस इन्स्पेक्टरलाच लिहिलं म्हणजे ताबडतोब काम होईल. ( पत्र पाकिटांत घालतो ) आतां लागलीच पोलीस इन्स्पेक्टरच्या घरींच पोंचतं केलं पाहिजे. पोष्टांत टाकलं तर उशीर व्हायचा. सदू असेलच जवळ कुठें. सदू, अरे सदू ( जातो )

( गणपतराव हातांत एक पत्र घेऊन प्रवेश करतात. )

**गणपतरावः**–( वाचीत ) " रा. रा. पोलीस इन्स्पेक्टर यांस कृ. सा. न. वि. वि. मीं एक राजनिष्ठ व कर्तव्यतत्पर नगरवासी असून आपणांस कळवण्याचें धाडस करतों कीं उद्यां गुरुवारीं पांच वाजतां ( विचार करून ) पावणे पांच वाजतां—हो पावणे पांचच लिहावं म्हणजे चुकामुक होण्याची भीति नाहीं— ( लिहितो ) निजामबागेंत दोन माथेफिरूंनीं समशेर युद्ध करण्याचें योजिलें आहे योद्ध्यांपैकीं एक, शहरचे प्रमुख सावकार असून कुटुंबवत्सल गृहस्थ आहेत. प्रजेचें संरक्षण करणें आपलें कर्तव्य आहे. तसदी दिल्याची माफी असावी. क. लो. अ. ही. वि. एक हितेच्छु. " ये म्हणावं आतां त्या समशेरबहादुराला ! तुला नाहीं तुझ्या बापाला नाहीं भिणार. घरच्याच पत्त्यावर सरळ पाठवावं म्हणजे कुठें गहाळ होण्याची भीति नाहीं.

( माधवराव हातांत पत्र घेऊन येतात. )

**माधवरावः**–कुठें दडी घेऊन बसला आहे, हा सदू ? ( गणपतरावांना पाहून हात पाठीकडे घेऊन पत्र लपवतो )

**गणपतरावः**–(माधवरावांस पाहून हात पाठीकडे घेऊन पत्र लपवतो) काय माधवराव !

**माधवरावः**–कसं काय गणपतराव.

**गणपतरावः**–उद्यांच्या या बेताविषयीं कुणाजवळ शब्द काढूं नका. ह्या पहा दोघी मायलेकी येत आहेत. अगदीं तोंडाला कुलूप.

**सरस्वतीः**–ऐकलं का, उद्यां पांच वाजतां गायन समाजांत भास्करबुवांचं गाणं होणार आहे.

**गणपतराव**:–पांच वाजतां ?

**सरस्वती**:–तुम्हीं याल ना ?

**गणपतराव**:–अशक्य; उद्यां मला यत्किंचितही वेळ नाहीं.

**सरस्वती**:–काय इतकं निकडीचं काम आहे ?

**गणपतराव**:–तुम्हां बायकांना काय त्याचं महत्त्व समजणार ?

**सरस्वती**:–जसं कांहीं तरवार गाजवायलाच जायचं आहे कुठें !

**गणपतराव**:–होय, बाईसाहेब, तरवार गाजवायलाच जायचं आहे. उद्यां पांच वाजतां निजाम बागेंत. बाराव्या पलटणीचे मुख्य समशेर-बहादूर संभाजीराव भोसले यांच्याशीं.

**सरस्वती**:–( आश्चर्यानें व उपहासिकपणें गणपतरावांकडे पहाते व नंतर माधवरावांकडे वळून ) काय हो, हे शुद्धीवर आहेत का ?

**माधवराव**:–( गंभीरपणें ) गणपतरावांनीं निवेदन केलेल्या गोष्टींत एक अक्षरही खोटें नाहीं.

**विद्या**:–( घाबरून ) हें नसतं अरिष्ट कसं ओढवलं, बाबा ?

**सरस्वती**:–तरवार कशाशीं खातात हें तरी माहित आहे का ? अगदींच अक्कल चुलींत गेलेली दिसते आहे.

**गणपतराव**:–मीं आपण होऊन कांहीं विकत श्राद्ध घ्यायला गेलों नव्हतों. पण माझा जर कोणीं विनाकारण अपमान केला तर मीं पेशवाई बाण्यानेंच वागणार. ( स्वगत, पत्र चाळवीत ) हा सदू कुठें गेला ? ( गणपतराव व माधवराव दोन बाजूंनीं जातात. )

**विद्या**:–( स्वगत ) मीं वसंतरावांस संध्याकाळीं या प्रकरणाची वर्दी देईन. ( जाते ).

**सरस्वती**:–( स्वगत ) हें प्रकरण थट्टेवारी घालवण्याच्या बाहेर गेलेलं दिसतं आहे. दिवसाढवळ्या तरवारी लढवायला पोलीसची तरी कशी परवानगी असेल ? नसणारच. मीं खुद्द पोलीस इन्स्पेक्टरलाच

वर्दी देतें म्हणजे मुळांतच खोडून निघेल. ( टेबलाजवळ जाऊन पत्र खरडते ) त्यांच्या घरींच पोंचतं करावं म्हणजे कुठें हेळसांड होणार नाहीं. ( मोठ्यानें ) अरे सदू ! ( सदू हातांत दोन पत्रें घेऊन येतो ). सदू, हें बघ, हें पत्र लिहिलेल्या मुक्कामीं ताबडतोब पोंचतं कर (जाते).

( माधवराव आंत येतात. सदूच्या हातांतील पत्रें पाहून हळूंच त्याच्यामागें लपतात ).

**सदूः**–( तिन्ही पत्रांवरील पत्ते बघत ) पोलीस इन्स्पेक्टर, पोलीस इन्स्पेक्टर, पोलीस इन्स्पेक्टर. ही भानगड काय आहे बुवा ? काय चोर-बीर येणार आहे कीं काय ? मला काय त्याची भीती. माझं उलटं चांगलंच फावलं. भर दुपारीं तीन घरं नको हिंडायला. एकाच ठिकाणीं गेलं कीं तिन्ही कामं खलास. चला सदोबा ( जातो ).

**माधवरावः**–अरे तिच्या ! तरीच आमचे श्वशूर एवढ्या ऐटींत बोलत होते. बराच खंबीर आहे प्राणी. कांहीं दाद लागूं दिली नाहीं.

( पडदा. )



# अंक चवथा

## प्रवेश पहिला

( गणपतरावांच्या घरची ओटी )

**माधवराव**:–( स्वगत ) चला, पावणेचार वाजले. पांच वाजतां हजर व्हायचें आहे. उशीर होता कामां नये, नाहींतर सगळेंच मुसळ केरांत.

**गणपतराव**:–( प्रवेश करीत, स्वगत ) निघावं आतां हळुहळु. वेळेवर गेलं पाहिजे, नाहींतर सारंच ऑफस व्हायचं.

**माधवराव**:–झाली तयारी ?

**गणपतराव**:–होय, पूर्णपणं. ही पहा तरवार (स्वगत) जरूर नाहींच लागायची तिची, पण जवळ तर हवीना ?

**माधवराव**:–( स्वगत ) काय पोकळ ऐट मारीत आहेत ! ( मोठ्यानें ) जायची वेळ आलीच होत. आपल्याला घरच्या मंडळींचा निरोप वगैरे घ्यायचा असल्यास—

**गणपतराव**:–छे छे. गुपचूप निघून जाऊं, नाहींतर गंगायमुनांच्या पुरांत सांपडून उशीर व्हायचा. ( बाहेर विद्या गात असल्याचा आवाज येतो.)

**विद्या**:–( गात गात आंत येत ) गेलां नाहींत वाटतं अजून, बाबा ?

**गणपतराव**:–निघालोंच बरं बाळ.

**विद्या**:–गाडी उभी आहे खालीं. ( स्वगत ) भिण्याचें कांहींच कारण नाहीं. आईनें पोलिसाला वर्दी दिली आहे आणि मीं वसंतरावांना कळवलें आहे ( हार्मोनिअम उघडते )

**गणपतराव**:–( विद्या जवळ आहे असें समजून डोळे पुशीत ) पुरे पुरे, रडूं नको, विद्या. जर तुझे बाबा फिरून तुला भेटले नाहींत–( वर पाहून ) अरेच्या, ही तर पेटी वाजवण्याच्या तयारींत आहे.

**सरस्वतीः**–( प्रवेश करिते ) ऐकलं का? जायच्या आधीं गाण्याच्या तिकिटांसाठीं दहा रुपये देऊन जावं. आहेत का खिशांत ?

**गणपतरावः**–हे घे वीस. अशा प्रसंगीं तूं जें कांहीं मागशील तें देईन. येतों आतां मी. नीट संभाळून रहा. विद्या अजून लहान व अल्लड आहे, तिच्या हिताचेंच—

**सरस्वतीः**–चार वाजले. आतां खोटी करून उपयोग नाहीं.

**गणपतरावः**–( स्वगत ) माझ्या पायाला विळखा घालून माझ्या जाण्यांत व्यत्यय आणायचा सोडून ही तर मला जाण्याचा आग्रह करते आहे. कंटाळली तर नाहीं ना मला ?

**माधवरावः**–( स्वगत ) वाहवा ! आमच्या सासूबाई तर चांगल्याच उलट्या काळजाच्या दिसत आहेत.

( गणपतराव व माधवराव जाऊं लागतात, इतक्यांत वसंतराव धांवत धांवत आंत येतात. )

**वसंतरावः**–थांबा, थांबा. जाण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं.

**सर्वः**–म्हणजे काय ?

हें काय गूढ आहे ?

तो कां नाहीं ?

**वसंतरावः**–मीं आतांच संभाजीरावांना गिरफदार करून आलों आहें.

**सर्वः**–गिरफदार ! ते कशाकरतां ?

**वसंतरावः**–होता एक बराच जुना आरोप त्यांच्यावर लागू.

**माधवरावः**–(स्वगत) माझा प्रतिस्पर्धी तर बराच खटाटोपी आहे.

**सरस्वतीः**–आपण आम्हांवर उपकारांवर उपकार लादीत आहां.

**विद्याः**–( स्वगत ) वसंतराव योग्य तऱ्हेनें ही कीड खोडून काढतील अशी माझी खात्री होतीच.

**गणपतरावः**–( स्वगत ) यांनां मध्यें तोंड घालायला कोणी सांगितलें होतें. मीं गुपचुपपणें सर्व बंदोबस्त केला होता. गुप्त शिपायांच्या एका

चौकडीनें योग्य तऱ्हेनें योग्य वेळीं या प्रकारास आळा घातला असता व समशेरबहादुरांशीं युद्ध करण्यास तयार झालेला धीराचा पुरुष म्हणून माझी ख्यातीही झाली असती. अर्धी रात्र जागून मीं माझ्या स्नेह्या-सोबत्यांना मीं समशेर युद्ध करणार म्हणून जाहिरात दिली होती. आतां हंसतील माझ्या तोंडावर सगळे दांत विचकून.

**सरस्वतीः**—वसंतरावाचे आभार मानण्याचे सोडून काय पुटपुटत बसलां आहां ?

**गणपतरावः**—(निरुत्साहानें) वसंतराव, मीं आपला फार आभारी आहें.

**सरस्वतीः**—अहाहा ! जशी कांहीं कुणी फांशीचीच शिक्षा दिली आहे. ( सरस्वती व विद्या जातात ).

**वसंतरावः**—हा अनिष्ट प्रकार मला वेळेवर मिटवितां आला म्हणून मला अत्यानंद होत आहे.

**गणपतरावः**—( स्वगत ) फिरून मला जीवदान दिल्याची शेखी मिरवतो आहे. ( मोठ्यानें ) आपल्याला खरं सांगायचं म्हणजे त्या इतिहासबहादुराची खोड मोडायची संधि आपल्यामुळें वांयां गेली, म्हणून माझा अतिशय हिरमोड झाला आहे. चांगला दाखवला असता हात त्या संभ्याला—( संभाजीराव आंत घुसतात, गणपतराव त्यांना पाहून कांपूं लागतात. )

**वसंतरावः**—( आश्चर्यानें ) संभाजीराव !

**गणपतरावः**—( वसंतरावास ) त्यांना तुरुंगांत अडकवून ठेवलें होतें म्हणून आपण मला आत्तांच सांगितलंत ना ?

**संभाजीरावः**—होय, ठेवलें होतें अडकवून परंतु आपल्या खास भेटीसाठीं घेतलें मीं स्वतःला सोडवून. वसंतराव, हजार रुपयांचा जात-मुचलका भरून व एक जामीन देऊन आज संध्याकाळपर्यंत सुट्टी मिळ-विली. ही पहा लेखी परवानगी. तेव्हां कृपा करून नऊ वाजेपर्यंत माझ्या वाटेस जाऊं नका.

**वसंतराव**:-मीं आपल्या विनंतीवरूनच आपल्यास कैद करवलें होतें. एका विशिष्ट कारणामुळें आपल्याला तुरुंगांत जाण्याची अतोनात हौस होती.

**संभाजीराव**:-ती हौस अजूनही कायम आहे. परंतु मीं रा. शहाण्यांना आज संध्याकाळीं भेटण्याचें वचन दिलें होतें तें मोडण्याची माझी काडीमात्र इच्छा नव्हती.

**वसंतराव**:-गणपतरावही आतांच माझ्याजवळ आपल्या भेटीचा लाभ होणार नाहीं म्हणून खेद प्रकट करीत होते.

**संभाजीराव**:-आतां पावणे पांच वाजले आहेत. माझ्या साक्षीदारास घेऊन येईपर्यंत सहज तास सवातास लागेल. तेव्हां साडे सहा वाजतां मीं ठरीव ठिकाणीं हजर राहीन. योजिलेल्या सामन्याला दीड तास विलंब होईल याबद्दल माफ करून, गणपतराव, आपण साडे सहा वाजतां निजामबागेंत हजर रहावें.

**गणपतराव**:-( स्वगत ) साडे सहा! तोंपर्यंत गुप्त शिपाई कंटाळून निघून सुद्धां जातील.

**संभाजीराव**:-वसंतराव, निजामबागेंत आपणही रा. शहाण्यांच्याबरोबर येणार असाल. आमचें काम आटोपल्याबरोबर आपण तेथल्यातेथेंच मला फिरून गिरफदार करून न्यावें. मीं बिलकुल गडबड करणार नाहीं. आतां येतों मी. ( जाऊं लागतो ).

**गणपतराव**:-अहो, थांबा थांबा. आपल्या हातून घडलेली चूक कबूल करण्यांत मनाचा खरा थोरपणा दृग्गोचर होतो हें याच क्षणीं मला पटून येत आहे.

**संभाजीराव**:-आं ? ( स्वगत ) लागला वाटतं बामण शेंपूट हलवायला.

**गणपतराव**:-आपली माझ्या हातून घडलेली चूक मीं पदरांत घेतों.

**संभाजीराव**:-इथें घेतां पदरांत, पण तिथें ?

**गणपतराव**:-तिथें कोठें ?

**संभाजीराव**:–महाबळेश्वरीं. सुखनिवास हॉटेलच्या शेरेबुकांत आपण ठळक अक्षरांत लिहिलें आहे कीं—

**गणपतराव**:–तें सर्व मा सपशेल परत घेतों.

**संभाजीराव**:–नुसतं परत घेण्यानें काय होणार ? आपण मला दिलेला बहुमानाचा शेरा येणाऱ्या जाणाऱ्या सर्व लोकांच्या स्पष्टपणें दृष्टीस पडत आहे त्याचें काय करणार ?

**गणपतराव**:–मग तो सर्व मजकूर खोडून टाकण्याकरितां मीं फिरून महाबळेश्वरीं जाऊं कीं काय ?

**संभाजीराव**:–आपणच सुचवलं आहे तेव्हां माझें कांहीं म्हणणें नाहीं.

**गणपतराव**:–कमाल केलीत !

**संभाजीराव**:–याच पावलीं गेलं पाहिजे असा कांहीं माझा आग्रह नाहीं. सावकाशपणें उद्यां परवां गेलांत तरी चालण्यासारखं आहे.

**गणपतराव**:–आपली फारच कृपादृष्टी आहे माझ्यावर.

**संभाजीराव**:–आतां येतों मीं. आपल्या सलोख्याच्या वृत्तीमुळें मीं मनापासून संतुष्ट झालों आहे. रामराम. वसंतराव, आतां आपल्याला नऊ वाजेपर्यंत थांबण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. मीं याच क्षणापासून आपला बंदा गुलाम आहे.

**वसंतराव**:–कायद्यानें आपल्याला नऊ वाजेपर्यंत मुक्ती दिली आहे तेव्हां मीं त्याच्या आधीं आपल्याला गिरफदार करूं शकत नाहीं.

**संभाजीराव**:–ठीक आहे. माझ्या घराचा पत्ता आपल्याला माहीत आहेच. येण्याचा संकोच करूं नये. रामराम, रामराम ( जातो ).

**वसंतराव**:–( स्वगत ) बिचारे गणपतराव, त्यांच्याशीं काय बोलावं हेंच समजत नाहीं.

**गणपतराव**:–( स्वगत ) आतां स्वतःशीं ढोंग करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. धडधडीत माफी मागितली अन् काय ? परंतु ही गोष्ट इतक्या थरावर जाऊन पोंचायला कारण कोण ? हे लुडबुडे वसंतराव. अजून येथेंच घुटमुटत आहेत. पाय काढणार आहे का नाहीं ही स्वारी, का आणखी आमच्यावर उपकार करायचे शिल्लक राहिले आहेत ?

**वसंतराव**:-सकाळीं म्हटल्याप्रमाणें मीं जकातीच्या नाक्यावर गेलों होतों.

**गणपतराव**:-आपण अत्यंत सहृदय आहांत.

**वसंतराव**:-त्यांनीं फिर्याद् काढून घेण्याचें वचन दिलें आहे.

**गणपतराव**:-हं.

**वसंतराव**:-परंतु आपण त्यांना घडलेल्या गोष्टीबद्दल खेदद्र्शक एक पत्र लिहावं अशी त्यांची इच्छा आहे.

**गणपतराव**:-खेदद्र्शक ? म्हणजे आणखी माफीच मागायची कीं नाहीं, आणि तीही लेखी. महाराज ! बस्स करा आपली लुडबुड. माझ्या कारभारांत तोंड घालायची तुमची खोड कधीं जाईल कीं नाहीं ?

**वसंतराव**:-आपल्या—

**गणपतराव**:-होय, माझ्या कारभारांत ! संभाजीरावांना तुरुंगांत घालण्याची उठाठेव करण्यास तुम्हांला कुणीं सांगितलं होतं ? सरळ आम्ही दोघे पांच वाजतां निजामबागेंत हजर राहिलों असतों.

**वसंतराव**:-मग साडेसहा वाजतां तेथें हजर होण्यास कोणचा अडथळा होता ?

**गणपतराव**:-( घुटमुळत ) पांचांत आणि साडेसहांत जमीन अस्मानाचें अंतर आहे.

**वसंतराव**:-तें कसें ?

**गणपतराव**:-कसें म्हणून विचारतां ? सांगतोंच तर—नको पण—तुम्हीं कोण माझ्र लागून गेलां आहांत ? नाहींच सांगणार. परंतु आपले उपकार मात्र पुरे करा. यापुढें मी सातासमुद्रांत घरंगळत जाऊन पडत असलों तरी मला सांवरायची तसदी घेऊं नका, माझ्या प्रतिस्पर्ध्याला तुरुंगांत अडकवण्याची शिताफी लढवूं नका, आणि सरकारी कायद्याचें उल्लंघन केल्याबद्दल तुरुंगांत जाण्याची मला आडकाठी करूं नका. ढवळाढवळ करणारीं माणसें मला आवडत नाहींत.

**वसंतराव**:-माझ्या हातून—

**गणपतराव**:–माझ्या नाहीं आणि हातून नाहीं, जरा दुसऱ्याला स्वस्थ बसूं द्यायचें नाहीं. सारखे हात धुवून माझ्या पाठीस लागलां आहांत. आतां बस्स तुमची लुडबूड आणि पुरे तुमचे उपकार. ( रागारागानें कोंपऱ्यांतल्या एका टेबलाजवळ जाऊन बसतात ).

**वसंतराव**:–( स्वतःशीं ) माझी तर बुद्धीच गुंग झाली.

**माधवराव**:–( स्वगत ) वसंताचा कांटा तर मार्गांतून पूर्णपणें दूर झाला. ( मोठ्यानें ) गणपतरावजी, मी येतों आतां. आपल्या सवडी-नुसार माझ्या मागणीचा निर्णय करून मला कळवण्याची तसदी घ्यावी.

**गणपतराव**:–छे छे, आतां जाऊं नका. खालीं उभे राहिलेल्या गाडी-वाल्याचे पैसे चुकते करून आलोंच मी. ( घरांत सरस्वती व विद्या बोलत असल्याचें ऐकूं येतें ) अरेच्या, ही सुद्धां गेली नाहीं वाटतं गाण्याला. मग तर थांबाच थोडा वेळ. आतांच होऊं दे सोक्षमोक्ष. मीं कोणचा जामात पसंत केला आहे याची प्रथम त्या दोघींना खबर देऊन नंतर आपल्याला कळवतों ( जातो. )

**माधवराव**:–काय वसंत, काय खबरबात ? अरे आतां वांकडें तोंड करण्यांत काय अर्थ आहे ?

**वसंतराव**:–बरोबर आहे तुझं म्हणणं. नव्हतं माझ्या नशीबांत—

**माधवराव**:–अरे, नशीब बिशीब हे सर्व नालायक, भ्याड, आळशी लोकांचे शब्द आहेत.

**वसंतराव**:–तसं कां होईना? मीं भ्याड,आळशी व नालायक मनुष्य आहे.

**माधवराव**:–चिडूं नको. मीं सांगूं ? आपल्या दुहेरी सामन्यांत तूं अंड्यांवर अंडीं केलींस म्हणून तूं हरलास.

**वसंतराव**:–तीं कशीं ? सांग तरी.

**माधवराव**:–सांगतों ऐक. तुझ्यांत एक महामोठा दोष आहे.

**वसंतराव**:–एकच ? ऐकूंदे तरी कोणता तो.

**माधवराव**:–दुसऱ्याच्या उपयोगी पडायचं तुझ अखंड व्रत. अशा लक्ष-णांनीं स्वतःचें नुकसान होतें. ( गणपतराव दारापर्यंत येऊन थांबतात. )

**वसंतराव**:–चालूं द्. मीं लक्ष देऊन ऐकतों आहें.

**गणपतराव**:–( स्वगत ) मीही पूर्ण लक्ष देऊन ऐकत आहें.

**माधवराव**:–जगांत मीं तुझ्यापेक्षां अधिक टक्केटोणपे खाल्ले आहेत. आणि म्हणून मी तुला एक बहुमूल्य सल्ला देतों. या खेपेस नाहीं तर पुढल्या खेपेस तुझ्या उपयोगीं पडेल. पढतमूर्खांवर कधींही उपकार करूं नये.

**वसंतराव**:–कारण ?

**माधवराव**:–कारण कृतज्ञतेचें ओझें पढतमूर्खाला फार वेळ झेंपत नाहीं. फार काय, कित्येक वेळां चांगला समंजस माणूसही ह्या ओझ्या-खालीं वाकून जातो.

**वसंतराव**:–अहो पंडीत, आपलें तत्त्वज्ञान बरेंच विसंगत होत चाललें आहे.

**माधवराव**:–तुला पटत नाहीं माझं सांगणं. ठीक आहे. एक उदाहरण घेऊन सांगतों म्हणजे पटेल तंतोतंत. माझे श्वशूर गणपतरावच घे.

**गणपतराव**:–( दारामागें, स्वगत ) अरे माझा धांवा करीत आहेत. ऐकूं द तरी आमचे जामात आमची काय स्तुति करीत आहेत ते.

**माधवराव**:–खऱ्या शाहण्या माणसांत तर त्यांची कोणी गणना कर-णार नाहीं ना ? नुसते नांवाचेच शहाणे. त्यांच्या मर्जीतून तूं हळूहळू उतरत गेलास.

**वसंतराव**:–ही गोष्ट तर कांहीं खोटी नाहीं.

**माधवराव**:–आणि खरं म्हटलं तर तूं त्यांचा जीव बचावलास. म्हणून तुझं तोंड पहातांक्षणीं तुझ्या थोर कृत्याची आठवण होऊन त्यांच्या मनाला कृतज्ञतेचा पाझर फुटतो असं तुला वाटतं कीं काय ? बिलकुल नाहीं. उलट तुझं दर्शन होतांक्षणीं स्वतःचें अश्वकलेंतील संपूर्ण अज्ञान व लोकांसमोर घडून आलेली स्वतःची फजिती याची मूर्तिमंत साक्ष पटून त्यांना तुझाच तिटकारा येतो.

**वसंतराव**:–हें पांडित्य औरच आहे.

**माधवराव**:—इतकं करूनही आगींत तेल घातलंस. जें समशेरयुद्ध घडून येणें कधींही शक्य नव्हतं तें विनाकारण थांबवून तूं त्यांच्या पोकळ वीरश्रीचा उपहास केलास.

**वसंतराव**:—घडून येणें शक्य नव्हतं हा शोध कोठून आणि कसा लावलास ?

**माधवराव**:—कारण तें थांबवण्याची मींही थोडीशी खटपट केली होती.

**वसंतराव**:—मग मला कां नांवें ठेवतोस ?

**माधवराव**:—अरे शहाण्या, मीं जर कोणावर उपकार केले तर ते लपवून छपवून करतों.

**वसंतराव**:—त्यांत लाजिरवाणं काय आहे ?

**माधवराव**:—तें सर्व परिस्थितीवर अवलंबून आहे. व्यवहारांत ज्याच्याशीं गांठ असेल त्याला ओळखून वागलं पाहिजे. म्हणून फिरून सांगतों कीं तूं डोळ्यांसमोर आलास कीं गणपतरावांचं डोकं फिरतं तें कां ? तर तुला पाहून त्यांना आपल्या मूर्खपणाची व कमीपणाची जाणीव पटून मनांतल्या मनांत ओशाळल्यासारखं वाटतं आणि या सर्व भावनांची प्रतिक्रिया तुझा द्वेष करण्यांत होते.

**वसंतराव**:—या वृत्तीला कृतघ्नताच म्हटलं पाहिजे.

**माधवराव**::—कृतघ्नता ही स्वाभिमानाचीच एक आवृत्ति आहे. एका तत्त्ववेत्त्यानें तर कृतघ्नतेला मनःस्वातंत्र्य असेंही म्हटलं आहे.

**वसंतराव**:—हें सगळं जरी मीं कबूल केलं तरी तूं निजामबागेंत होणाऱ्या प्रकाराला अडथळा काय घातला होतास हें तर सांगशील कीं नाहीं ?

**माधवराव**:—हात्तिच्या, मीं फक्त एक निनांवी पत्र लिहून गुपचूप पोलिसांत वर्दी दिली होती, दुसरं काय ?

**वसंतराव**:—अरे, गुपचूप लपवून पत्र लिहिलं होतंस मग गणपतरावांना कसं कळलं ?

**माधवराव**:—कारण त्यांनींही तसंच एक निनांवी पत्र लिहिलं होतं.

**वसंतराव:**-तरीच राहून राहून म्हणत होते कीं पांचांत आणि साडे सहांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. हें कारस्थान माझ्या नाहीं बुवा ध्यानांत आलं.

**माधवराव:**-भोळा सांब आहेस, लेका. धोरण म्हणून कशाशीं खातात याचा पत्ताच नाहीं. बाकी माझ्या पथ्यावरच पडलें तुझें भोळेपण. गणपतरावांना मीं अगदीं पहिल्या दिवसापासून ओळखून राहिलों आहे, म्हणून त्यांच्याशीं वागण्यांत मीं अगदीं तुझ्या उलट मार्ग सुधारला.

**वसंतराव:**-तो कसा ?

**माधवराव:**-रस्त्यावरील एका सामान्य सापाला मींच स्वतः मारून त्यांना त्यावर गोळ्या झाडण्याची संधी दिली व स्वतःच्या हातावर एक टांचणी टोंचून प्रथम त्यांचया देखतच स्वतःच त्यांतील रक्त शोषून नंतर त्यावर त्यांना फुंकर मारायला सांगून त्यांनींच माझा जीव बचावला अशी त्यांची समजूत करून दिली. त्या दिवसापासून मीं त्यांच्या हर्षाच, अभिमानाचें, विजयाचें निशाणच होऊन बसलों आहें. मला पहातांक्षणींच त्यांचा चेहरा प्रफुल्लित होतो. त्यांचें मन प्रसन्न होतें व त्यांना मोरपिसें फुटूं लागतात.

**वसंतराव:**-बराच कुशल आहेस म्हणायचा.

**माधवराव:**-ते निरुत्साही दिसूं लागले कीं मीं त्यांना खुलवतों. वर्तमानपत्रांत त्यांच्यावर लेख लिहितों; शब्दाला दोन पैसे व मथळ्याला आठ आणे.

**वसंतराव:**-शाबास, म्हणजे तो लेख लेका तूंच—

**माधवराव:**-अरे एवढ्यानं काय झालं आहे. लवकरच त्यांचें रंगीत चित्र काढवून घेतों बघ. कालियामर्दन करणारा आधुनिक कृष्ण !

**वसंतराव:**-आहे बुवा. कल्पना मोठी रमणीय आहे.

**माधवराव:**-म्हणून सांगतों, वशा, दुसऱ्यावर उपकार करणें हें काम सोपें आहे. परंतु दुसऱ्याकडून आपल्यावर उपकार करवून घेणें किंवा अशी त्याची दृढ समजूत करून देणें हें अत्यंत कसबाचें काम आहे. व तें काम तडीस नेणारा कुशल कारागीरच अशा नाजुक सामन्यांत विजयी होऊन—

( गणपतराव, सरस्वती व विद्या प्रवेश करितात )

**गणपतराव**:–सुदैवानें आपण दोघेही अद्यापि येथेंच आहांत. आमच्या कन्येला मागणी घालून आपण दोघांनींही आमचा उभयतांचा सत्कार केला आहे.

**वसंतराव**:–( स्वगत ) पाल्हाळ लावून माझें मरण कां उगीच लांबणीवर टाकीत आहेत.

**गणपतराव**:–त्या विषयींचा निर्णय मी आतां करणार आहे. माधवराव ! तुमच्या विषयीं मला वाटत असलेल्या प्रेमाची खूण म्हणून मीं तुम्हाला आज एक अमूल्य—

**माधवराव**:–( जीभ चाटीत विद्येकडे पहात ) त्याबद्दल मीं आपले आगाऊच आभार मानतों.

**गणपतराव**:–तुम्हांला आज एक अमूल्य सल्ला देतों. या खेपेस नाहीं तर पुढल्या खेपेस तो तुमच्या उपयोगीं पडेल. दरवाजा उघडा ठेवून कधींही मोठ्यानें बोलूं नये ! ! !

**माधवराव**:–( आश्चर्यानें ) आं ?

**गणपतराव**:–नकळत माझे कान उघडल्याबद्दल, माधवराव, मीं तुमचा अत्यंत ऋणी आहे. वसंतराव, तुम्ही आपल्या स्नेह्यांपक्षां जगांत कमी टक्केटोणपे खाल्ले आहेत. तुम्हांला त्यांच्याइतकें धोरण नाहीं, व तुमची दृष्टी त्यांच्याइतकी व्यवहारी नाहीं. म्हणूनच माझ्या कन्येला तुमच्या सहवासांत अधीक सुख लागेल अशी खात्री वाटून मी तिला तुमच्या स्वाधीन करतों. ( विद्येचा हात वसंतरावांच्या हातीं देतो. ) माधवराव, आपल्या जगत्प्रसिद्ध चित्रकाराजवळ आपण एक चित्र काढण्याचा सौदा करून चुकलांच आहांत, आणि कालियामर्दन करणारा आधुनिक कृष्ण तर नष्टच झाला तेव्हां—

**सरस्वती**:–खरंच गडे, माझ्या विद्येची आणि वसंतरावांची तसबीर काढून घ्यावी.

**गणपतराव**:–कसं बरोबर माझ्या मनांतलंच बोललीस !

( पडदा )

**समाप्त**